# नवभारत

वर्ष ८ वें ] मे १९५५ [ अंक ८ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका
















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






## ' नवभारत ' निधि

# विनंति

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ' नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु देणगी देणारास ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत जाईल. त्या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे एप्रिल १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| सौ. प्रमिला दाणी ( नागपूर ) | १०० |
| श्री. र. के. खाडिलकर ( पुणें ) | १०० |
| श्री. गो. ह. देशपांडे (नाशिक) (पहिला हप्ता) | २५ |
| | २२५ |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | १८४२ |
| एकूण | २०६७ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या " खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ " या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।४।१९५५
पुणें ४

**कृ. ना. फडके**
**मा. प. मंगुडकर** } कार्यवाह

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें

अंक आठवा

# नवभारत

मे

१९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर—आचार्य स. ज. भागवत—श्री. हरि कृष्ण मोहनी—प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# ‘नवभारत’ मासिक, मे १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे– का. सं. ]

**डॉ. प्र. न. जोशी एम्. ए. पीएच्. डी.** – पुणें येथील नूतन मराठीविद्यालय हायस्कूलचे उपप्रमुख. यांच्या पीएच्. डी. च्या प्रबंधाचा विषय ‘ मधुरा भक्ति ’ हा होता.

**श्री. प्रेमा कंटक** – महाराष्ट्रांतील एक थोर सामाजिक कार्यकर्त्या. ‘ सत्याग्रही महाराष्ट्र ’, ‘ कनक आणि कामिनी ’ इत्यादि पुस्तकांच्या लेखिका. त्या नुकत्याच हिमालयांत गेल्या आहेत. प्रस्तुत अंकांतील त्यांचा लेख, त्यांच्या हिमालययात्रेमागील भूमिकेचें किंचित् दर्शन करून देईल.

**श्री. बाबा मोहोड ( माघान, जि. अमरावती )** – कस्तुरबा – निधीच्या बुनियादी शाळेंत शिक्षक. ‘ भूमिदानयज्ञाचीं गाणीं ’ व ‘ नवा प्रकाश ’ ( नाटिका ) या पुस्तकांचे लेखक.

**म. म. दत्तो वामन पोतदार ( पुणें )** – सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक आणि शिक्षणशास्त्रज्ञ. त्यांचे नियतकालिकांतून अनेक लेख, संशोधनपर टिपणें, प्रसिद्ध झालीं असून त्यांचा ‘ दत्तो वामन पोतदार : वाङ्मयदर्शन ’ हा लेखसंग्रह प्रसिद्ध आहे.

**डॉ. सुनीतिकुमार चतर्जी एम्. ए. डी. लिट्.**, पद्मभूषण – पश्चिम बंगालच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष. कलकत्ता-विद्यापीठांत ‘ तुलनात्मक भाषाशास्त्र ’ या विषयाचे एमेरिटस प्रोफेसर. भाषाशास्त्रावरील अनेक ग्रंथांचे लेखक. पश्चिम बंगाल राष्ट्रभाषा-प्रचारसमितीचे अध्यक्ष.

**श्री. मास्ती वेंकटेश आयंगार ( बंगलोर )** – एक अग्रगण्य कन्नड साहित्यिक. यांचा विस्तृत परिचय ‘ नवभारता’च्या एप्रिल १९५३ च्या अंकांत एका स्वतंत्र लेखद्वारेंच करून देण्यांत आला आहे. तो जिज्ञासूंनीं अवश्य पहावा.

**श्री. के. नारायण काळे बी. ए. एल्एल्. बी.** – ( पुणें ) महाराष्ट्रांतील प्रसिद्ध नाट्य-चित्रपट-दिग्दर्शक, पटकथालेखक. ‘ सहकार-मंजरी ’ ( १९३२ ) या कवितासंग्रहाचे लेखक.

**श्री. बा. अ. शिनकर** – पुणें येथील बृ. म. कॉलेज ऑफ कामर्समध्यें सीनिअर बी. कॉम्. चे विद्यार्थी.

**श्री. मा. गो. काटकर बी. ए. एस्. टी. सी.** – सोलापूर येथील विद्याविकास हायस्कूलचे संस्थापक; ‘जयजयवन्ती ’ या काव्यसंग्रहाचे लेखक.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

डॉ. प्रल्हाद नरहर जोशी

# विरही ज्ञानदेव

आत्म्याचें परमात्म्याशीं, जीवाचें शिवाशीं, ससीमाचें असीमाशीं जडलेल्या अनुभवगम्य नात्यास भक्ति असें नांव आहे. या नात्याची चरमसीमा म्हणजे जिवाशिवाचें ऐक्य व त्यांतून प्रतीत होणारें अनिर्वचनीय सुख ही होय. परमेश्वरभेटीसाठीं लागलेली तळमळ व आतुरता, त्याच्या भेटीविना मनाची होणारी तगमग, त्याच्या विरहानें मनाची होणारी बावरी अवस्था, त्याच्या भेटीमुळें मनास मिळालेलें समाधान इत्यादि मनाच्या सर्व अवस्थांचा परिचय साधुसंतांच्या सहजस्फूर्त अशा उद्गारांतून पहावयास सांपडतात. भक्तीच्या या विशेष प्रकाराचा आविष्कार शृंगाराच्या भाषेंत कधींकधीं होत असतो. वैदिक वाङ्मयांतहि उपमेसाठीं म्हणून आलेलीं शृंगारिक उदाहरणें पुष्कळच सांपडतात. भागवत-पुराणाची जी छाप नंतरच्या सर्व भारतीय भक्तिमार्गावर पडलेली आहे तीवरून या शृंगारमिश्रित भक्तीचें स्वरूप समजावून घेतां येण्यासारखें आहे. चैतन्यपंथांतील रूपगोस्वामीनें आपल्या ‘ उज्ज्वलनीलमणि ’ या ग्रंथांत या भक्तीस ‘ मधुरा भक्ति ’ असें नांव देऊन श्रीकृष्ण व त्याच्या सख्या यांना विभावादिकांचें रूप दिलें आहे. मधुरा भक्तीची सविस्तर चर्चा भारतीय वाङ्मयांत पहिल्यानें चैतन्यसंप्रदायांत झाली. अगदीं अलीकडच्या काळांत आपल्याकडे श्रीगुलाबरावमहाराज यांनीं या मधुरा द्वैतभक्तीची तात्त्विक चर्चा मोठ्या अधिकारवाणीनें केली आहे.

## अवर्णनीय अनुभूतीचें प्रकटीकरण

भक्तीच्या या विशिष्ट प्रकाराची मानसशास्त्रीय चिकित्सा मात्र अजून झालेली नव्हती. माझ्या प्रबंधांत मी प्रथमच या दृष्टीनें शृंगारमिश्रित भक्तीकडे पहाण्याचा प्रयत्न केला आहे. मधुराभक्तीच्या अतिरेकी आचारामुळें तिच्याबद्दल खूपच गैरसमज पसरलेले आहेत. श्रीकृष्ण – राधा यांच्या नांवाखालीं वाटेल त्या ढंगदार वृत्तीच्या माणसानें आपल्या रांगड्या भावनांना भक्तीचा साज चढवावा असें अनेक वेळां घडत आलें आहे. तेव्हां, भक्तींतील शृंगारास काय आधार आहे ! ज्ञानदेव, कबीर, नामदेव, एकनाथ, चैतन्यप्रभु, तुकाराम इत्यादि श्रेष्ठ संतपुरुषांच्या अनुभूतिपूर्ण उद्गारांत शृंगारविषयक उदाहरणें व ती भाषा कां येत असते ? तो एक शुद्ध भक्तीचा आविष्कार असतो कीं वैषयिक वृत्तीचाच तो एक नांव बदलून कांहीं वेगळा पण उदात्त ( Sublimate ) झालेला प्रकार असतो ? – या प्रश्नांचें उत्तर शोधण्यासाठीं विस्तृत अशी मानसशास्त्रीय चर्चा करून उदात्तीकरणा – ( Sublimation ) च्या मार्गानेंहि मधुराभक्तींत वैषयिक वृत्तीस थोडेंहि स्थान नाहीं असा निष्कर्ष निघतो. या दोन वृत्तींत जमीन-अस्मानाचा फरक आहे असाच सूर विल्यम जेम्स, सेल्बी, प्रॅट, अंडरहिल इत्यादींसारख्या मानसशास्त्रज्ञांच्या विवेचनाचा निघतो. मग शृंगारी भाषा भक्तीच्या मार्गांत शिरली ती कोणत्या आधारावर ? तर त्याचें साधें उत्तर असें कीं परमेश्वरमीलनाची अथपासून इतिपर्यंतची ही प्रक्रिया व्यक्त करण्यासारखी नाहीं. अवर्णनीय अशी ही अनुभूति शब्दांत मांडण्यासाठीं केवळ दाखला म्हणून, उदाहरण म्हणून मानवी शृंगाराचा उपयोग नाइलाजानें भक्ताला करावा लागतो. ज्ञाताच्या साह्यानें अज्ञाताची ओळख करून देण्याची प्रथा सर्वसंमत अशी आहे. ज्ञानदेवांच्या वाङ्मयांतील उदाहरण या ठिकाणीं देण्यासारखें आहे. बाराव्या अध्यायांत भक्त व ईश्वर यांच्या एक्याचें वर्णन करतांना, भक्ताची थोरवी गातांना ज्ञानदेव चटकन बोलून जातात :

“ अर्जुना, तो भक्त । तोचि योगी तोचि मुक्त ।
तो वल्लभा, मी कांत । ऐसे पढिये ॥ ”

–( अ. १२. १५६)

( माझा भक्त माझी पत्नी व मी तिचा पति आहे. याप्रमाणें माझें प्रेम माझ्या भक्तावर असतें असा भावार्थ ) हा आपला दाखला अर्जुनास आवड-








णार नाहीं याची जाणीव ज्ञानदेवांना त्याच क्षणीं झालेली दिसते. पण बोलणेंच खुंटल्यानें नाइलाजानें केवळ श्रद्धेवर बोलावें लागतें.

' म्हणोनि गा आम्हां । वेगा आली उपमा ।
येऱ्हवी काय प्रेमा । अनुवादु असे ॥ "

-(१२.१५९)

परमेश्वर व भक्त यांच्या प्रेमाला खरोखरीच 'अनुवादु' नसल्यामुळें ही शृंगारमिश्रित भाषा वापरावी लागते. या साधुसंतांच्या उद्गारांना अर्वाचीन काळांतील मानसशास्त्रज्ञहि महत्त्व देत असतात. मानसशास्त्रीय चर्चा येथें संपूर्णपणें देण्याचा उद्देश नाहीं. पण ज्ञानदेवांसारखे वैराग्यशील संतपुरुष परमेश्वराशीं रममाण कसे होतात व आलेल्या अनुभूतींच्या अवस्थांचें प्रकटीकरण कसें करतात एवढेंच या लेखांत आपण संक्षेपानें पाहणार आहोंत. भक्तीच्या विविध छटांचा उत्कृष्ट आविष्कार संतांच्या अभंगरचनेंत झालेला आहे. प्रत्येक अभंग म्हणजे परमेश्वरप्रीतींत रंगून गेलेल्या मनाची एकएक अवस्था आहे. तत्त्वज्ञानांतील रूक्षता येथ कधींच नसते, तर सुखद अनुभूतीची सोज्ज्वळ प्रसन्नता मात्र संतांच्या अभंगवाङ्मयांत आहे. म्हणून सर्वसामान्य जनतेसहि या कृतींचा लोभ आजहि वाटतो.

## ज्ञानदेवकर्तृक 'विरहिणी'

ज्ञानदेवांची अभंगसंपदा फार मोलाची आहे. साक्षात्काराचा किंवा ऐक्याच्या अनुभूतीचा जिवंत झरा त्यांत झुळुझुळू वहात असतांना दिसतो. ज्ञानेश्वरांच्या अभंगांची चर्चा जेव्हां सुरूं होते तेव्हां अनेक वादाचे मुद्दे उपस्थित होतात. अभंगकर्ते ज्ञानदेव ज्ञानेश्वरीकर्त्या ज्ञानदेवांपेक्षां निराळे आहेत काय ? या प्रश्नाची चर्चा त्यांतील अधिकारी लोकांनीं केलेली आहे. त्या सर्व विवेचनांच्या निष्कर्षावरून ज्ञानदेवी लिहिणाऱ्या संतपुरुषानेंच अभंगरचना केली आहे हें ध्यानीं घेऊनच पुढचें वर्णन मी करणार आहें. पण एवढ्यानें अडचण निवारण होतेच असें नाहीं. ज्या शृंगारमिश्रित अभंगांचा मी या लेखांत विचार करणार आहें ते अभंगच ज्ञानदेवाचे नव्हेत असें एखाद्यानें म्हटलें तर सर्वच इमला कोसळून जावयाचा.' त्यांत छापलेलीं कांहीं अर्थहीन कूटें, शृंगारिक वर्णनें व मिश्र स्वरूपाचे घेडगुजरी अभंग यासारखी रचना ज्ञानदेवकृत असेल अशी वाटत नाहीं " (डॉ. शं गो. तुळपुळे; 'पांच संतकवी' पृ. ३४). प्रा. कृ. वें. गजेन्द्रगडकरांचा अभिप्राय याहून विचारणीय असा आहे. विषयोपभोग प्रत्यक्ष व्यवहारांत अनुभवावयास मिळत नसल्यानें कोणातरी भोंदूनें व मूर्खानें हे शृंगारी अभंग लिहिले असावेत असा या बाबतींतील त्यांचा निर्णय आहे. " श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या स्वतः ला 'गौळीण' किंवा 'विरहिणी' समजून देवास प्रियकराप्रमाणें संबोधतील ही कल्पनाच मुळीं अप्रशस्त, अक्षम्य व अशक्य वाटते."- ('श्रीज्ञानेश्वरदर्शन' भाग पहिला, साहित्यखंड पृ. ३०९ ).

डॉ. तुळपुळे व प्रा. गजेन्द्रगडकर यांच्या या मतांची थोडी चिकित्सा केली पाहिजे. एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं ज्या शृंगारी अभंगांबद्दल दोघांनीं अधिक्षेपाचे उद्गार काढले आहेत, त्याच अभंगांचें विवरण त्यांनीं खऱ्या ज्ञानेश्वरांचे खरे अभंग म्हणून केलें आहे ! ज्ञानदेवांच्या साक्षात्कारमार्गाचें विवरण करतांना डॉ. तुळपुळे ज्ञानेश्वरांच्या 'विरहिणी'चेंच वर्णन करतात व ती 'विरहिणी' सुद्धां पूर्ण शृंगारिक आहे. अनेक शृंगारिक अभंगांचे अर्थ त्यांनीं दिले आहेत. ज्ञानदेवांचें वियोगदुःख, रात्रींचें झालेलें जागरण, सर्वांगाची होणारी आग, विरहांतून उत्पन्न होणारें कारुण्य इत्यादि सर्व प्रकार डॉ. तुळपुळे यांनीं वर्णन केला आहे. इतकेंच नव्हे तर " हेंच ज्ञानदेवांचें खरें आत्मपर काव्य आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे त्यांतील कारुण्याचें आकलन होऊं शकतें " ('पांच संत कवी,' पृ. ८३ ) असें म्हणून त्यांचा पुरस्कारहि केलेला आहे. मग शृंगारिक रचना ज्ञानदेवांची असेल असें वाटत नाहीं या बोलण्यांतील अर्थ काय ? प्रा. गजेन्द्रगडकरांनींहि हेंच केलें आहे. अभंगांतील शृंगार 'भोंदू' व 'मूर्ख' कवीचा ठरवून श्रीज्ञानदेवांचे आध्यात्मिक अनुभव वर्णन करतांना मात्र त्यांच्या रंगाचीं व नादाचीं जीं उदाहरणें त्यांनीं घेतलीं आहेत तीं बहुधा ज्ञानदेवकृत शृंगारी विरहिण्यांतीलच आहेत. ज्ञानेश्वरांच्या या शृंगारी अभंगांना एवढें बिचकून जाण्याचें काय कारण आहे ? पति-पत्नी, प्रियकर-प्रेयसी यांच्या नात्यावर आधारलेले शेंकडों दृष्टान्त ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांत नाहींत काय ? मग स्वानुभूतिपर उद्गारांत म्हणजे अभंगांतच ते आले तर बिघडलें कोठें ?








कित्येक वेळां प्रचलित गाथ्यांतील वर्गीकरण असतें तेंहि फसवें असतें. ‘ विरहिणी ’ या सदरांतील २७–२८ अभंग व ‘ गौळणी ’ या सदरांतील १४–१५ अभंग ज्ञानेश्वरांचे नाहींत असें म्हटलें कीं ज्ञानदेवांच्या भक्तीचें ‘ शुद्धीकरण ’ झालें अशी समजूतहि भाबडी आहे. कारण त्यांच्या इतर शेंकडों अभंगांतून शृंगारी भाषा आढळतेच. रूपवर्णन, देवापाशीं मागणें, अद्वैतज्ञान, विठ्ठलकृपा इत्यादि विविध प्रकारच्या सदरांतूनहि शृंगारी भाषेंतील अभंग हवे तेवढें सांपडतील. त्यांचें काय करावयाचें ? का त्याहि अभंगांना गौळणी-विरहिणींच्या सदरांत घालून त्यांचें ज्ञानदेवकर्तृत्व हिरावून घ्यावयाचें ? शिवाय असे जे अभंग आहेत ते ‘ बाप रखुमादेवीवरु ’, ‘ ज्ञानदेव ’, ‘ ज्ञानेश्वर ’ इत्यादि नेहमींच्या मुद्रांनीं अंकित झालेले आहेत हेंहि ध्यानांत घ्यावयास पाहिजे. तेव्हां विरहिणी व गौळणी या ज्ञानदेवांच्याच आहेत असें मानल्याखेरीज गत्यंतर नाहीं.

## विरहिणीचा विरहताप

यानंतर ज्ञानेशांच्या या अनुभूतिसंपन्न अशा वाङ्मयाकडे वळावयाचें आहे. सर्व साधुसंतांनीं श्रीकृष्णाचें स्वरूपमाधुर्य व त्याच्या बालक्रीडा मोठया तन्मयतेनें वर्णन केल्या आहेत. ज्ञानदेवांनींहि कृष्णाचें म्हणजेच विठ्ठलाचें लावण्य परोपरीनें वर्णन करून सांगितलें आहे. या कृष्णास त्यांनीं आपला पति वा प्रियकर समजून अनेक वेळां त्याची आळवणी केली आहे. “ समर्थ भगवान् श्रीकृष्ण याला मी सोयरा म्हणजे प्रियकर केला हें लोकदृष्टया वाईट झालें खरें, परंतु मला हा सर्व प्रपंचसुखाचा आधार झाला गे बाई ! हा बाप रखुमादेवीवर आमचा प्रियकर आहे. ” ( अभंग क्र. ६९३– येथून पुढचे सर्व अभंग-क्रमांक साखरेकृत ‘श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचा सार्थ गाथा’ यांतील आहेत. ) या प्रियकराबरोबर बोलावयास मिळावें, त्याचा सहवास घडावा, त्याच्याशीं अंगसंग जडावा, त्याच्या आलिंगनांतील सुख भोगावें म्हणून तर भक्ताची ही सारी खटपट सुरू असते. भक्त क्रमाक्रमानें परमेश्वरापाशीं आपलें प्रियत्वाचें अंतिम नातें जोडीत असतो. ज्ञानदेवहि परमात्म्याचें दास्य प्रथम करीत आहेत. त्याची मनोभावें सेवा आपल्या हातून घडावी असें त्यांना वाटतें. “ शहाण्याच्या घरीं दासी म्हणून मी राहीन; पण दुसरीकडे जाणार नाहीं. तो रानांत गुरें चारणारा भगवान् श्रीकृष्ण मला धनी म्हणून मिळाला तर सोन्याचा पर्वत हातीं आल्याप्रमाणें आनंद मला होईल ...... तो वैष्णवांना प्रिय असणारा श्रीकृष्ण मला प्राप्त व्हावा गे बाई ! ” ( ३३२ ). त्याची प्राप्ति होण्यासाठीं वाटेल ते शारीरिक कष्ट सोसण्यासहि ही विरहिणी तयार आहे. “ अग बाई ! ज्या वस्त्राला पांच दिडक्यांचीहि किंमत नाहीं असें जाडेंभरडें वस्त्र मी नेसेन व त्या प्रभूचें उष्टेंहि मी खाईन. त्याच्या दासीची दासी होईन पण एकदां त्याच्या गृहांत प्रवेश मिळवीन. त्याच्या घरीं शरीरभोगाची मला इच्छा नाहीं. त्याच्या दारांत मी पडून राहीन. दाराचा उंबरा मी उशास घेईन. इतकें करून मी माझ्या जन्ममरणाच्या येरझारा चुकवीन गे बाई ! ” ( ८८० ). परमेश्वराची सेवा घडावी, त्याचें दर्शन नित्य व्हावें, त्याचा सहवास घडावा म्हणून तर ही सारी धडपड. एकसारखें त्याचेंच चिंतन, त्याचेंच वेड मग तिच्या मनाला लागूं लागतें. “ हे कृष्णा ! तुझ्या सगुण स्वरूपाच्या ठिकाणीं मन लुब्ध होऊन गेलें आहे रे. तुझी भेट देण्यास चुकूं नकोस. ( ‘ तुजवीण वेल्हाळा, कैं सुखसोहळा । रखुमादेवीवरा, विठ्ठला, सेजें न लगे डोळां ” ) (३४०). श्रीकृष्णभेटीची आतुरता दिवसेंदिवस वाढतच असते. त्याच्या भेटीशिवाय मन बेचैन होऊन जातें. कृष्णाचाच एकसारखा ध्यास लागून ध्यानीं-मनीं-स्वप्नीं त्याचेंच रूप उभें राहतें. “ हे प्राणवल्लभा कृष्णा, तुझ्या गुणांची कीर्ति ऐकून मन इतकें उत्कंठित झालें आहे कीं धावत येऊन तुला आलिंगन द्यावें असें वाटतें. या बलवत्तर इच्छेमुळें माझा देह, माझें मन, माझी वाचा सर्व कांहीं तुझ्या स्वरूपीं येऊन मिळालें आहे. मनानें तुला आलिंगन देण्यासाठीं उतावीळपणानें दोन्ही हात वर उचलले पण तुझ्या यथार्थ स्वरूपाचा विचार करतांना तुझें तसें स्वरूप नसल्यानें माझे ते हात खालीं आले. डोळ्याची टक लावून तुझ्या स्वरूपाकडे पाहणें ही क्रियाहि थांबली. ” ( ८०६ ). श्रीकृष्णाच्या प्राप्तीसाठीं सर्व आप्तांचा त्याग करावा, सगेसोयरे सोडून द्यावेत, मनाच्या सर्व वृत्ती स्थिर करून त्याच्या स्वरूपांत विलीन होण्याचा प्रयत्न करावा. पण तो मात्र भेटूं नये ! मग जिवाची होणारी त्रेधा काय पुसावी ? “ ज्या श्रीकृष्णाच्या प्रीतीकरितां सर्व संसार







टाकून दिला, त्यानें माझ्याशीं अबोला कां बरें धरिला ? ज्याच्या पायाशीं मिठी घालून गांठ घेण्यासाठीं मी निघालें तो कृष्ण माझ्यासमोर उभा कां राहात नाहीं ? कसेंहि करून त्याची माझी भेट घडवाच हो. त्याचे पाय मी आपल्या केसांनीं झाडीन. त्याच्या सगुण रूपाला मी अगदीं भाळून गेलें आहे " ( ९०० ).

अशा प्रकारच्या सतत चिंतनानें, सतत ध्यासानें भक्तास विरहाच्या वेदना होऊं लागतात. परमेश्वराच्या वियोगानें त्याचा जीव तडफडूं लागतो. विरहाग्नीनें तो व्याकुळ होऊन गेलेला असतो. त्याच्या डोळ्यांवरील झोप उडते; तरी त्याच्या तोंडीं कृष्णप्रेमाची आर्तता असतेच; " श्रीकृष्णा, मी तुझ्यापासून दूर देशांत पडल्यामुळें मला रात्रंदिवस तुझा आठवण होत आहे रे! तुझा वियोग नको बाबा. त्यामुळें जिवास फारच कष्ट होतात. " (३२९). " हे मनमोहना, तुझ्यावांचून एकटीला मला रात्रीं करमत नाहीं रे " असें म्हणत असतांनाच कधीं कधीं कृष्णाचा, त्याच्या मुरलीचा साक्षात्कार होतो. " इतक्यांत काय चमत्कार झाला कीं तूं हातांत वेणु घेऊन वाजवूं लागलास. सर्वजणी तुझ्याकडे धावल्या. त्यांच्या अंतःकरणांत तूं प्रवेश केलास; आणि आमच्या अंतःकरणाला चोरणारा तूं लौकिकासाठीं, ' पलीकडे व्हा, दूर व्हा ' म्हणून कदाचित् आमचा अव्हेर करशील, तर हे कृष्णा, असें करूं नकोस रे. " ( ८७६ ). इतकी प्रार्थना करूनहि श्रीकृष्ण येऊन भेटत नाहीं तेव्हां या विरहिणीच्या अंगाची आग होऊं लागते. आरामासाठीं केलेले सर्व उपचार तिला नकोसे वाटतात. एकट्या कृष्णाशिवाय तिला कशानेंहि सुख वाटत नाहीं. " हा चंद्र अतिशय थंड खरा, पण हा मला उबारा करतो गे बाई ! या उबाऱ्याच्या निवृत्तीचीं व्यावहारिक साधनें म्हणजे अंगाला चंदन लावणें, वारा घालणें हीं होत. पण यांपैकीं कांहीं करूं नका. कारण माझ्या अंगाचा दाह एवढ्यासाठीं होत आहे कीं आज बिछान्यावर श्रीकृष्ण परमात्मा नाहीं. ही माझ्या जीवनांतील गोष्ट तुझ्या ध्यानांत कशी येत नाहीं ? माझ्या अंगाचा दाह निवारण करणारा तो बलवान् पंढरीराणा एकटाच आहे. त्याच्यावाचून आतां माझे प्राण टिकत नाहींत. त्याची प्राप्ति होणें हें माझ्या जळणाऱ्या शरिराला अमृतपानच आहे. " ( ८७८ ). " नीलवर्ण परमात्म्याचा वियोग हीच कोणी रात्र, अशा रात्रीं विरहानें वेडी झालेली ही स्त्री. तिला आपल्या बिछान्यावर एकाकी अशी झोप येणार कशी ? श्रीकृष्णाच्या विरहानें तीहि निळीकाळी होऊन गेली आहे. तिच्या अंगाला चंदनाची उटी लावली तरी तिला आराम न वाटतां उलट तिच्या अंगाची उष्णता वाढतेच. " ( ८८५ ). अशा प्रकारचा विरहताप ज्ञानदेवांनीं परोपरीनें वर्णन केलेला आहे. याच वियोगतापानें जणुं परमेश्वरसुद्धां विरघळतो. त्याला द्रव फुटतो व तो येत असल्याच्या खुणा विरहिणीस पटूं लागतात. तिला तसे कांहीं शकुन होतात तिचा सखा भेटावयास येणार आहे असा निरोप जणुं भोंवतीच्या वस्तु तिला मूकपणें सांगत असतात !

### विरहिणीचें स्वप्न

एक विरहिणी दुःखानें अशीच व्याकुळ झालेली आहे, तों घरापलीकडे एक कावळा ओरडूं लागल्याचें तिच्या कानीं येतें. पाहुणा येणार असल्याची वर्दीच जणुं तो देत असतो. शुभ-शकुन सांगणाऱ्या कावळ्यास ती म्हणतेः " माझा श्रीकृष्ण जर येणार असेल तर कावळ्या, तूं उडून जा. मी तुझीं पाउलें सोन्यानें मढवून टाकीन. पण जातांना एवढें सांगून जा कीं पढंरीराव पाहुणा येणार तरी केव्हां ? बोल रे, तुझ्या तोंडीं मी दहीभाताचा घास घालीन. पण मला एकदां प्रियाची वार्ता सांग. दुधाची वाटी मी तुझ्या ओठीं देईन. पण तो विठ्ठलराणा केव्हां येणार आहे तें सांग. माझ्या दारींच्या आंब्याला हीं रसाळ फळें लगटलेलीं आहेत. तीं हवीं तर चाख. पण आज मला कांहीं तरी शुभ वृत्तान्त सांगच. " ( ८९२ ). आणखी एके ठिकाणीं ती म्हणतेः " शुभशकुन सांगणारा माझा हा डोळा आज लवत आहे. आणि आज मला स्वप्नहि पडलें कीं मी माझ्या मैत्रिणींना म्हणत आहे, ' माझ्या अंगावर दागिने घाला, चंदनाची उटी लावा, जाई, जुई, पारिजातक, शेवंती इत्यादि फुलांची शेज तयार करा. माझा अंगावर घेण्याचा शेला तयार ठेवा. आज मोठ्या भाग्याचा दिवस आहे. श्रीकृष्ण-भेटीचा सोहळा आज मंदिरांत साजरा होणार आहे. यासाठीं सख्यांनो, तुम्ही गुढ्या उभारा, मखर शृंगारून तयार ठेवा, आज त्याची भेट होईल, त्यास मी आलिंगन देईन. पहा, माझे बाहू आत्तांच कसे स्फुरण पावत








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहेत ही पहा अंगांतील चोळी अंगांत मावेनाशी झाली आहे ...... हा वसंत ऋतु माझ्या अंतःकरणांत काम उत्पन्न करीत आहे. मी त्या प्रियकरापुढें जाईन व आनंदानें नाचेन.' आम्ही जगांत पुष्कळ पुरुष पाहतों पण या श्रीकृष्ण परमात्म्याचें लाघव कांहीं विचित्र आहे !" ( ८९३ )

## कृष्णमीलनाचा ब्रह्मानंद

विरहिणीच्या या स्वप्नास खरोखरींच अर्थ प्राप्त होतो. तिच्या ध्यानीं वसणारें स्वप्नीं दिसतें व स्वप्नींचें सगुणसाकार रूपांत पुढें येऊन ठाकतें. शेवटीं तिचा वियोग संपतो. तिचें दुःख दूर होतें. श्रीकृष्णपरमेश्वर तिला येऊन भेटतो; आणि मग कृपामृतानें न्हाऊन निघालेल्या या भाग्यवान् स्त्रीची अवस्था काय वर्णन करावी ? सर्व वासना निवलेल्या असतात. सर्व इच्छा फळास येतात. ऐक्याचा साक्षात्कार झाल्यानंतर ती कृष्णरूपच बनून जाते. " सख्या सावळया श्रीकृष्णाला पाहिल्याबरोबर माझ्या मनाची तळमळ शांत झाली आहे." (४३). " माझ्या जीवाचें जीवत्व नष्ट होऊन वासना जागच्या जागीं मुरल्या. माझ्या डोळयांना तो शामसुंदर परमात्माच दिसत आहे. त्या सावळयाच्या बाजेवर मला आत्मसुखच दिसलें " ( ४४ ) परमेश्वरभेटीचा हा अवर्णनीय आनंद ज्ञानेश्वरांनीं परोपरीनें वर्णन केला आहे. भेटीनंतरच्या अवस्थेसंबंधीं ते म्हणतातः " मी त्याला जाणावयास गेलें आणि त्याच्याच रूपांत मिसळून गेल्यानें जाणणेंच राहिलें ... कानांनीं ऐकणें, डोळयांनीं पाहणें वगैरे क्रिया करण्याविषयीं मन आंधळें झालें " ( ६६८ ). ' कवतुक पहावया निरंजना गेलिये । तंव निराकार झालें बाईये वो ' असा भेटीचा अनुभव अनेक ठिकाणीं व्यक्त झालेला दिसतो. " सूक्ष्म विचार करीत करीत श्रीकृष्णाला पहावयास गेलें तों त्यास पाहतांक्षणींच मी तद्रूप झालें. उन्मन जो परमात्मा त्याच्या ठिकाणीं मन शांत होऊन तो सांवळा श्रीकृष्ण परब्रह्मच वाटला. तोच माझ्या शरीरांत अवतीर्ण झाला आहे " ( ७७८ ). श्रीकृष्णभेटीचा सोहळा वर्णन करतांना ज्ञानदेव म्हणतात, " आतांपर्यंत मी मोकाट म्हणजे स्वैर असल्यामुळें लोकांनीं डोळे मुरडण्याची फुकट खटपट केली. पण आतां मोठ्या प्रयासानें मी समर्थाच्या पदरीं पडलें, आतां कोणाचीहि भीति उरलेली नाहीं. " ( ९१२ ).

"अगे सखे, रात्रंदिवस श्रीकृष्णच माझ्या घरीं असल्यामुळें काय कौतुक सांगावें बाई ! माझा देहभावच नाहींसा होऊन मी चकित होतें बाई " ( ९१३ ). या कृष्णमीलनाचा ब्रह्मानंदहि ठिकठिकाणीं व्यक्त झालेला आहे. " ज्याप्रमाणं दारू प्यालेला मनुष्य देहभान विसरून आपली बडबड थांबवितो, त्याप्रमाणें लोक ब्रह्मरस पिऊन बेभान होतात व त्यांच्या वृत्तींत मौन दिसूं लागतें. जेवण झाल्यावर तृप्तीचा ढेंकर येतो ना, तसाच आत्मानुभवी पुरुषहि सुखी होतो " ( ४९७ ). या स्वानंदसागरांत रममाण होणाऱ्या भक्ताच्या सुखाचें वर्णन काय करावें ? " श्रीकृष्णाच्या स्वरूपांत म्हणजे सुखाच्या समुद्रांत मी पूर्णपणें बुडून गेलें हो. त्याच्याबरोबर मी आनंदाचा संवाद केला. मला भेट देऊन तो माझ्याच मनांत घर करून बसला आहे. .....आवडीनें मी त्याच्या घरांत गेलें तर तोच माझ्या हृदयांत येऊन बसला " (६२२). "श्रीकृष्णाशीं ऐक्य पावल्यामुळें माझें जातिकुल सर्व कांहीं हरपून गेलें. आतां श्रीकृष्णाशिवाय मी दुसरें कांहीं जाणत नाहीं. संभावित स्त्रियानीं परपुरुषाच्या ठिकाणीं प्रेम ठेवूं नये असें म्हणतात, असें तुम्ही मला सांगतां. पण आता काय त्याचा उपयोग ? त्या श्रीकृष्णपरमात्म्यापाशीं मी रममाण होऊन गेलें आहें. श्रीकृष्णप्रीतीचें सुंदर लेणें मी आपल्या अंगावर धारण केलें आहे. " ( ८९९ ). या सुखाच्या बिछान्यावर परमात्म्याशीं खेळ करीत असतांना कित्येक वेळां मधुर असा सुखसंवाद किंवा कलह सुद्धां होतो. " श्रीकृष्णासहित स्वानंदाच्या शय्येवर खेळत असतांना काय कलह झाला कोणास माहीत ? शेवंतीचें फूल तोडल्यावर तिची जशी अवस्था होते तशीच माझीहि झाली आहे किंवा अंगणांतोल कमळांच्या फुलांवर पर्जन्य पडल्यामुळें ती टवटवींत व्हावींत परंतु लागलीच त्यावर कोणी कढत पाणी ओतल्यावर तीं करपून जावींत तशीच माझी गत झाली आहे. टपोरे मोती उत्पन्न व्हावेत म्हणूनच स्वातीचे मेघ पाणी वाहात असतात; त्याचप्रमाणें माझ्या ठिकाणीं गुणांची लावणी करण्यासाठींच तो आला होता. त्याचा आनंद काय वर्णावा ? त्या नीलवर्णाच्या कृष्णानें माझ्या अंतःकरणांत जणु मोत्यांचा सडाच घातला पण या आनंदाच्या भरांत तो चोरटा मधुकर माझ्या जवळ आला. मज कमळणीचा








आश्रय त्यानें घेतला त्यामुळें मोत्यांचा चारा मिळाल्यानें राजहंसास जसा आनद होतो तसाच अद्वितीय आनंद मला झाला. असें असतां चाफेकळीसारखी मी तिला सोडून तो खुशाल निघून गेला त्यामुळें माझी काय स्थिति झाली आह म्हणून सांगूं ? माझ्या डोळयांत एकसारखें पाणी यत आहे. त्या मदनानें मला संतप्त करून सोडल आहे. माझ्या डोळयांतून सतत झिरपणाऱ्या पाण्यानें मोत्यांनीं गुंफलेला हा शेला पार भिजून गेला आहे. प्रियकराच्या वियोगानें मनाची जी तगमग होते ती सामान्य कशी म्हणूं ? ' आतां येतो' म्हणून तूं गेलास आणि वेळ तरी किती लावतोस ? बावनी चंदन जरी उगाळून माझ्या देहाला लावला तरी गारवा कसा येणार ? मला वियोगाच्या दुःखांत ठेवून कोणा भाग्यवान् स्त्रीच्या हातीं तूं सापडलास ? "— अशा प्रकारचा वियोगाचा व भेटीचा प्रसंग ज्ञानदेवांनीं मोठ्या बहारदार पद्धतीनें आपल्या अनुभूतिपर अभंगवाङ्मयांत साकार केलेला आहे.

ज्ञानदेवांना आलेल्या या विविध अनुभूतींचे प्रकारहि पुष्कळ आहेत. एक गमतीचा प्रसंग जसाच्या तसा येथें देण्यासारखा आहे.

" काय सांगूं तूतें बाई, काय सांगूं तूतें ? ॥ ध्रु. ॥
जात मी होतें यमुने पाणिया, वाटत भेटला सांवला ॥१॥
दोईवल तोपी मयुल पुछाची, खांद्यावली कांबला ॥२॥
तेणें माझी केली तवाली, मग मीं तेथून पलाली ॥३॥
पलतां पलतां घसलून पलली, दोईची घागल फुतली ॥४॥
माझे धुलगे फुतले, मग मी ललत बथले ॥ ५ ॥
तिकून आले शालंगपानी मला पोताशी धलिलें ॥६॥
मला पोताशीं धलिलें, माझें समाधान केलें ॥ ७ ॥
निवृत्तीचे कृपें सुख हें ज्ञानदेवां लाधलें ॥ ८ ॥ "

या अभंगांतील भावना बाल्यवृत्ति दर्शविणारी असली तरी तींतील तीव्र अनुभूति मात्र पाहण्यासारखी आहे.

### अंबुला-अंबुलीचें रूपक

विरहिणी-गौळणींखेरीज ज्ञानदेवांची स्वतंत्र अशी कांहीं रूपकात्मक अभंगरचना आहे. ज्या योगसंप्रदायांत ज्ञानेश्वर वावरले त्यास अनुसरून कांहीं कूट–रचनाहि त्यांनीं केलेली आहे. अंबुला-अंबुलीचं आध्यात्मिक रूपक शृंगारी भाषेंत ज्ञानेश्वरांनीं अनेक ठिकाणीं रंगविलें आहे : " अखंड अद्वैतस्वरूप जो परमात्मा हाच नवरा समजून मी त्याच्याबरोबर विवाह केला आणि इतर प्रापंचिक विचार सोडून दिला. टाकून देण्यास योग्य असा गृहाचार सुद्धां मी सोडला. परमेश्वरप्राप्तीशिवाय दुसरा विचारच माझ्या मनास शिवला नाहीं. श्रीविठ्ठलाबरोबर ऐक्य झाल्याबरोबर सर्व व्यवहार नष्ट झाला गे बायांनो ! " ( ९१७ ). इतरापेक्षां आपण सुखी आहोंत असा भाव दाखवितांना एकजण म्हणते : " जिचा अंबुला म्हणजे परमात्मा-पति टाकून गेला आहे तिच्या जीवनाला आग लागो ! माझी मात्र तशी स्थिति नाहीं. मी माझ्या प्रियकराला मुळीच रुसूं देत नाहीं. अग, ज्याच्या कृपेनें मी या महत्पदास पोंचलें त्या माझ्या पतीची, विठ्ठलाची मी रोज समजूत करतें " ( ४१९ ) सगुणनिर्गुणाचा बोधहि याच रूपकाच्या आधारें ज्ञानेश्वर कधींकधीं देत असतांना दिसतात. " जो सगुण श्रीकृष्ण परमात्मा तोच माझा निर्गुण पति झाला आणि त्यानें माझा सर्व गृहाचार बुडवून टाकला. मला रात्रंदिवस जाच करणारी सासूजी आशा तीहि त्यान नष्ट करून टाकली. आणि शांतिमाउली मला भेटण्यास आली. " ( ९२४ ). परमात्मभेटीचा दिवस म्हणजे साधुसंतांना दिवाळीचा सण वाटतो. एक अंबुली म्हणते: " हा श्रीकृष्ण परमात्मा अगाध सुखाचा सागर आहे. म्हणूनच त्याचा वर्णहि काळा आहे. असा हा भ्रतार मला बोलावीत आहे. या कृष्णपरमात्म्याच्या बोलावण्यानें मला आज प्रेमसुखाची दिवाळी आल्याप्रमाणें वाटतें. कारण हा श्यामतनु वनमाळी माझ्या घरास आला आहे " ( ९२७ ).

### निकोप मधुरा भक्ति

ज्ञानदेवांनीं आपले अनुभव शृंगाराच्या भाषेंत किती विविध प्रकारांनीं सांगितले आहेत हें आपण पाहिलें. विरहाच्या अनेक छटा त्यांच्या अभंगांत दिसून येतात. श्रीकृष्णभेटीचे अनेक प्रसंग त्यांनीं बोलके केले आहेत. मुख्य गोष्ट म्हणजे शृंगाराची मर्यादा कोठेंहि ओलांडली गेलेली नाहीं. शारीरिक भोगविलासाचीं भडक वर्णनें, राधाकृष्णांची सविस्तर रासक्रीडा, त्यांच्या नांवावरील पांचट शृंगार, इत्यादि तथाकथित शृंगारभक्ति ( म्हणजे शृंगारावरील भक्ति ) ज्ञानदेवांच्या अभंगसाहित्यांत दिसत नाहीं. उत्तान शृंगार तर कोठेंच नाहीं. कबीर किंवा तुकाराम यांच्या अभंगांतील प्रमत्तता ज्ञानदेवांच्या अभंगांत नाहीं.

ज्ञानाच्या व वैराग्याच्या उदात्त भूमिकेवर ज्ञानदेवांचा हा शृंगारविलास असल्यामुळें त्याला एक प्रकारची सात्त्विकता प्राप्त झाली आहे. ज्ञानदेवांच्या कृष्णभक्तींत विरहाची आग, तडफड, आतुरता, मीलन, अत्यानंद हर्ष, उल्हास वगैरे सर्व कांहीं आहे. पण जो तो विकार संयमानें अनुभूतीच्या अधिराज्यांत आपापली मर्यादा ओळखून बसलेला दिसतो. शृंगाराचा योग्य तो उपयोग करून घेऊन त्याच्या माथ्यावर ज्ञानदेवांनीं खरोखरीच पाय देऊन एक अभिनव अशी पद्धति स्वीकारलेली आहे. ज्ञानेश्वरींत वा अमृतानुभवांत जी तात्त्विक चर्चा भक्तीच्या अनुषंगानें त्यांनीं केली तीच अभंगांत प्रेमाच्या जिव्हाळ्यानें ओलसर झाली आहे. गोसावी, स्वामिणी, मेहूण, पतिव्रता, स्वामी, कांता, अंबुला, भावारे आंबुलेपण, प्रियाप्रियु, शिवशक्ति, देवीदेवो, शंभु-शांभवी इत्यादि विविध शब्दांनीं ज्ञानदेवांनीं देवभक्तांतील अभिन्नता तात्त्विक भूमिकेवरून अमृतानुभवांत स्पष्ट केली आहे. तीच भूमिका त्यांची अभंग-रचनेच्या वेळींहि असावी. त्यांच्या अभंगांत ज्ञानेश्वरींतील व अमृतानुभवांतील शुद्धता, प्रसन्नता, तेजस्विता व आध्यात्मिकता आढळून येते. ज्ञानवैराग्याच्या अति उच्च अशा आसनावर शृंगाराचा दिमाख त्यामुळें 'मर्यादित' झालेला दिसतो. वाचकाच्या मनावर विपरीत परिणाम होणें तर दूरच; पण त्यांच्या या शृंगारमिश्रित अशा भक्तीस योगसामर्थ्याचा आधार आहे. त्यांच्या प्रतिभेचा जो निकोप प्रवाह आहे त्यांमुळेंच त्या अभंगांनाहि एक प्रकारचा निराळाच स्वाद व अर्थ प्राप्त झालेला आहे.

ज्ञानवैराग्यानें तेजस्वी झालेल्या या श्रेष्ठ संतपुरुषासहि विरहाची अवस्था भोगावी लागली आहे. मराठी वाङ्मयांतील मधुरा भक्ति स्वभावतःच निकोप अशी आहे. बंगाली वैष्णवांची एका टोकास गेलेली प्रथा येथें दिसून येत नाहीं. मधुराभक्तींतील उन्मत्तपणा, मूर्च्छा, भावावस्था इत्यादि प्रकारहि मराठी संतांत दिसून येत नाहींत. पुष्टिमार्ग किंवा चैतन्यसंप्रदाय यांत उत्तरोत्तर जसा अनाचाराचा प्रकार येऊन समाजापुढील नैतिक आदर्श भ्रष्ट झाला तसा प्रकार महाराष्ट्रांत झाला नाहीं. मधुरा भक्तीच्या दुधारी शस्त्राचा वापर मराठी भाषेंत फार बेतानें व विचार-पूर्वक झालेला आहे. अर्थात् संतांच्या अनुभूतीपुरतें हें बोलणें आहे. पंडित कवींच्या कृष्णभक्तीचा वेगळा विचार करावयास पाहिजे.

शेवटीं, ज्ञानदेवांच्या आणखी एकदोन शृंगारात्मक अभंगांचा उल्लेख करून हा विषय संपवूं. अध्यात्माचें रूपक शृंगारी भाषेंत एके ठिकाणीं त्यांनीं मांडलें आहे. "हरिनामाचा तांबूल खाऊन, गुरुकृपेचें काजळ मी माझ्या डोळ्यांत घातलें आहे." (७०१). भक्तीच्या मानसशास्त्रावर लिहिणारे पंडित ज्या आध्यात्मिक विवाहा - ( Spiritual Marriage ) चा उल्लेख आवर्जून करतात त्याचेंहि एक सुंदर उदाहरण येथें देणें अस्थानीं होणार नाहीं. "हातांत अद्वैताची माला घेऊन मी परमात्म्याशीं स्वयंवर केलें; आणि सिद्ध जें माझ परमात्मस्वरूप त्याचेठिकाणीं मी गेलें. त्या नवऱ्याजवळ मी बोललें नाहीं. फक्त त्याला पाहिलें मात्र, तों त्यानें मला भवसागरापासून दूर नेलें ...... मी भीत भीत त्याच्याजवळ गेलें. त्यानें मला हाताशीं धरलें. ... ..." (६१०).

मराठी संत 'सौरी' या शीर्षकाच्या खालीं कांहीं रचना करीत असतात. सौरी म्हणजे मुरळी वा बाजारबसवी स्त्री. पुढें एकनाथ, तुकाराम यांनीं अशा सौऱ्यांचें पुष्कळच वर्णन शृंगाराच्या भाषेंत केलें आहे. ज्ञानदेवांची एक 'सौरी' म्हणते : "आतां निर्लज्ज होऊन डोईवरचा पदर काढून टाका. ज्या स्त्रिया परपुरुषाशीं म्हणजे परमात्म्याशीं रममाण झाल्या आहेत त्याच खऱ्या पतिव्रता होत...... बाईयांनो, तुम्ही अशा नवऱ्यावांचून राहूं नका. निवडून एकच पति करा म्हणजे तुम्ही सुखी व्हाल आणि मग परम भाग्याचें असें अहेवपणाचें मरण तुम्हांस येईल ......" ( ९९५ ). 'सौरी' सुद्धां शुद्ध भाव धरून परमात्म्याच्या रूपांत विलीन होऊं शकते हेंहि ज्ञानदेवांना सांगावयाचें होतें कीं काय ? पिंगला, कान्होपात्रा इत्यादि पतित स्त्रिया भक्तिमार्गांत पतितांना मार्ग दर्शविणाऱ्या आहेतच. परिसाला फोड्यासाठीं लोखंडाचा घण जरी आला तरी परिसाच्या स्पर्शानें त्याचें सोनेंच होतें ( ज्ञा. ९-९६४ ) या त्यांच्या दृष्टान्तांतील मथितार्थ ध्यानांत घेण्यासारखा आहे.

---

आचार्य स. ज. भागवत

# आंतर-भारती

[ आचार्य स. ज. भागवत यांचें पुणें नभोवाणी केंद्रावरून 'आंतरभारती'वर भाषण झालें. तें पुणें नभोवाणी अधिकाऱ्यांच्या परवानगीनें येथें लेखरूपानें प्रसिद्ध केलें आहे — का. सं. ]

भारताच्या स्वातंत्र्य-घोषणेनंतर थोड्याच काळानें सानेगुरुजींनीं महाराष्ट्रांत 'आंतर-भारती'च्या आपल्या नव्या कल्पनेचा प्रचार आपल्या व्याख्यानांतून आणि लेखनांतून उत्कटतेनें सुरू केला. प्रारंभीं कांहीं दिवस त्यांनीं 'प्रांत-भारती' असा शब्द योजिला होता. पण अधिक विचाराअंतीं 'आंतरभारती' हाच शब्द त्यांनीं निश्चित केला. आचार्य जावडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं सन १९४९ च्या उन्हाळ्यांत पुणें येथें भरलेल्या महाराष्ट्रसाहित्यसम्मेलनाच्या अधिवेशनांत गुरुजींनीं स्वतःच आंतरभारतीच्या कार्यासंबंधींचा ठराव मांडला होता आणि त्याला महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार यांनीं पाठिंबा दिला. तो ठराव सर्वानुमतें मंजूर झाला होता. पुढें कांहीं कालानें सानेगुरुजींच्या देहावसानानंतर त्यांच्या स्नेह्यांनीं व चाहत्यांनीं आंतरभारतीचें कार्य मूर्त स्वरूपांत आणण्यासाठीं निधि गोळा केला व 'आंतरभारती' या संस्थेची रीतसर स्थापनाहि केली. गेलीं सुमारें तीन वर्षें आंतरभारतीचें काम चालत आलें आहे.

## 'विश्वभारती' व 'आन्तरभारती'

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतांत निरनिराळ्या फुटीरपणाच्या प्रवृत्ती वाढतील असा धोका निर्माण झालेला दिसल्यामुळें भारतीय एकतेची वाढ करण्यासाठीं एकाद्या सांस्कृतिक चळवळीची जरूरी आहे असें सानेगुरुजींना वाटूं लागलें होतें. म्हणून त्यांनीं गुरुदेव रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या विश्वभारतीचा सांस्कृतिक समन्वयाचा थोर आदर्श आपल्या डोळ्यांपुढें ठेवून भारतांत बंधुभावाचें वातावरण निर्माण करण्यासाठीं आंतरभारतीची कल्पना केली.

रवीन्द्रनाथांचा आदर्श जगांतील सर्व मानवांचें सांस्कृतिक संघटन बंधुभावनेच्या पायावर करण्याचा आहे. पाश्चात्त्य देशांनीं अलीकडच्या इतिहासामध्यें ज्या आक्रमक राष्ट्रवादाची उपासना चालविली आहे तिच्याविरुद्ध रवीन्द्रनाथांनीं आपली वाणी सतत चालविली आणि सत्ता, संपत्ति यांच्या स्पर्धेनें मानवसंस्कृतीचा विनाश झाल्याशिवाय राहाणार नाहीं असा जगाला इषारा दिला. रवीन्द्रनाथांच्या विश्वबंधुत्वाच्या नव्या ध्येयाचा पुरस्कार करणारे पुष्कळ विचारवंत आणि कलाकार निरनिराळ्या राष्ट्रांतून पुढें आले आणि त्यांतून 'विश्वभारती' या नव्या सांस्कृतिक विद्यापीठाची भारतांत निर्मिति झाली. 'यत्र विश्वं भवति एकनीडम्।' हा विश्वभारतीचा मुद्रालेख आहे. मानवमात्र सर्वत्र एक आहे, त्याचें हृदय सर्व ठिकाणीं आणि सर्वकाळीं एकतेचेंच स्पंदन करीत आलें आहे, अशी रवीन्द्रनाथांची श्रद्धा आणि अनुभूति असल्यामुळें, राष्ट्र, धर्म, संस्कृति इत्यादि भेदांनीं मानवकुलाच्या एकतेचा भंग होता कामा नये, असा एकतेचा नवा आदर्श रवीन्द्रनाथांनीं विश्वभारतीच्या द्वारें भारतापुढें आणि जगांतील सर्व राष्ट्रांपुढें ठेविला आहे. भेदांतून अभेद पाहाण्याची, विविधतेंतून एकता अनुभविण्याची भारतीय संस्कृतीची प्राचीन काळापासून चालत आलेली समन्वयदृष्टि आजच्या जगाला विशेष तारक होण्यासारखी आहे. असा रवीन्द्रनाथांचा सिद्धान्त होता. जीवनाचें सत्य स्वरूप तत्त्वतः एक असलें तरी त्याचा बाह्य आविष्कार नानाविध स्वरूपांतच होत असतो, म्हणून विविधतेमुळें विद्वेष निर्माण होण्याची गरज नाहीं. उलट, विविधतेंतील सौं.र्य अनुभविण्याची शक्ति माणसांनीं वाढविली पाहिजे. स्पर्धेऐवजीं सहकाराला, द्वेषाऐवजीं प्रेमाला जीवनांत श्रेष्ठ स्थान दिलें पाहिजे. राजकीय, आर्थिक आणि सामाजिक जीवनांतहि हीच दृष्टि स्वीकारल्याशिवाय मानवी जीवन संस्कृतिसंपन्न होणार नाहीं, अशी रवीन्द्रनाथांची शिकवण आहे. थोडक्यांत असें








म्हणतां येईल कीं भारताचें परराष्ट्रीय धोरण ज्या तात्त्विक सिद्धान्तावर उभारलें जावें असें आपणांस वाटतें ते सिद्धान्त रवीन्द्रनाथांच्या विश्वभारतीनें आधींच भारताला देऊन ठेवलेले आहेत. स्वतंत्र भारताला रवीन्द्रनाथांकडून मिळालेला हा मोठा सांस्कृतिक वारसा आहे असें म्हणतां येईल.

आंतरभारतीची जीवनविषयक तात्त्विक दृष्टि रवीन्द्रनाथांच्या विश्वभारतीहून यत्किंचित्‌हि निराळी नाहीं. जागतिक पातळीवर भिन्न भिन्न राष्ट्रांमध्यें जें सांस्कृतिक सहजीवन निर्माण व्हावें अशी विश्वभारतीची इच्छा आहे, त्याच सांस्कृतिक सहजीवनाची निर्मिति भारतीय गणराज्याच्या घटकराज्यांमध्यें करण्यासाठीं झटणें हें सानेगुरुजींच्या प्रेरणेनें निघालेल्या **आंतरभारती** संस्थेचें मुख्य कार्य राहील. **विश्वभारती** हें भारताचें परराष्ट्रीय धोरण (फॉरिन पॉलिसी) मानलें, तर **आंतरभारती** हें भारताचें अंतर्गत धोरण ( इंटर्नल पॉलिसी ) मानण्यास हरकत नाहीं.

### ‘अविभक्तं विभक्तेषु’

भारतीय राष्ट्रीयत्व हें पाश्चात्त्यांच्या आक्रमक राष्ट्रवादाचें अनुकरण करणार नाहीं. कोणत्याहि राष्ट्रीय प्रश्नाचा विचार करीत असतांना भारतीय राष्ट्र-पुढाऱ्यांनीं विश्वबंधुतेच्या आदर्शावरील आपली दृष्टि ढळणार नाहीं याची सदैव जागृति बाळगली पाहिजे. त्याचप्रमाणें भारतीयत्वाची जोपासना करीत असतांहि भारतीयत्व आणि प्रादेशिकत्व यांच्यामध्यें चांगला मेळ साधण्याचाहि प्रयत्न केला पाहिजे. भारतामध्यें भिन्न भिन्न भाषा बोलणारे वेगवेगळे लोकसमूह आहेत. भारतानें लोकशाही समाजवादाची अथवा सर्वोदयी समाजाची घोषणा केलेलीच आहे. लोकशाहीच्या विकासासाठीं भारतांतील प्रमुख लोकभाषांचा विकास झाला पाहिजे. शिक्षणाच्या सर्व प्रदेशांत लोकभाषा प्रतिष्ठेनें वावरूं लागल्या पाहिजेत. लौकिक आणि व्यावहारिक सर्व व्यवहारांत लोकभाषांचा वापर झाला पाहिजे. तरच लोकमानस समृद्ध होईल आणि लोकशाही चालविण्याची शक्ति लोकांमध्यें निर्माण होईल.

भारतीय गणराज्य हें भिन्न भिन्न प्रादेशिक घटकांनीं बनलें आहे. यामुळें भारतीय समाजाच्या विकासांत एकत्व आणि विविधत्व या दोनहि अंगांचें मीलन झालेलें आढळतें. या प्रादेशिक घटकांचें प्रदेशभाषा हें एक स्पष्ट वेगळेंपण दर्शविणारें महत्त्वाचें लक्षण आहे. मराठी, गुजराती, हिन्दी, बंगाली, असमिया, उडिया काश्मिरी, पंजाबी, कन्नड, तेलुगु, तामीळ आणि मल्याळम् या भारतीय गणराज्याच्या बारा प्रदेशभाषा प्रसिद्ध आहेत. उर्दू आणि सिन्धी या भाषांचे सलग पृथक् प्रदेश नसले तरी भारतीय गणराज्यांत त्या भाषा बोलणारे समाजहि मोठ्या प्रमाणांत आहेत. या चौदाहि भाषांचा सर्वांगीण विकास भारतीय लोकजीवनाच्या विकासाच्या दृष्टीनें आवश्यक आहे. बहुधा लौकरच भारतांत पहिल्या बारा भाषांचीं प्रदेशराज्यें निर्माण झालेलीं दिसतील. त्यामुळें सामान्य जनतेचा सर्व व्यवहार प्रदेशभाषेंत चालूं लागेल. शिक्षणाचें माध्यमहि प्रादेशिक भाषा बनेल आणि त्यामुळें या साऱ्या भारतीय भाषांचा झपाट्यानें विकास होत जाईल. या प्रादेशिक राज्यांचीं साहजिकच कांहीं वैशिष्ट्यें आहेत. या वैशिष्ट्यांचा योग्य तो सन्मान केला पाहिजे. मात्र या वैशिष्ट्यांचा प्रमाणाबाहेर अभिमान वाढणार नाहीं अशी दक्षता सर्वत्र घ्यावी लागेल. कारण प्रादेशिक भेद असले तरी भारतीयत्व सर्वत्र अभिन्नच आहे. म्हणून ‘अविभक्तं विभक्तेषु’ अशी आंतरभारतीची स्नेहाळ दृष्टि निर्माण केली पाहिजे. संघराज्याची हिन्दी भाषा प्रदेशभाषांना मारक होतां कामा नये, अथवा एकाद्या प्रदेशभाषेनें आपलेंच श्रेष्ठत्व घोषित करण्याचा वेडेपणाहि करणें योग्य नाहीं. भारताच्या या चौदा भाषा सर्वांच्या सर्व राष्ट्रभाषाच आहेत अशी व्यापक भावना भारतांत वाढविली पाहिजे. उत्तर हिंदुस्थानांतील हिन्दी ही प्रदेशभाषा असणाऱ्या लोकांनीं स्वखुषीनें दक्षिणेकडील एकादी द्राविड भाषा शिकण्याचा उत्साह दाखविला पाहिजे. म्हणजे भाषिक आक्रमणाची भीति कोणाला वाटणार नाहीं.

प्रदेशभाषेच्या अभ्यासाबरोबरच भारतांतील भिन्न भिन्न भाषांचा परिचय करून घेण्याची खटपटहि प्रत्येक प्रदेशांत चालू झाली पाहिजे. सध्यां इंग्रजी भाषेचा पगडा सुशिक्षितांच्या मनावर इतका मोठा आहे कीं आपल्या सुशिक्षितांना इंग्लंड व अमेरिकेंतील साहित्यिकांची माहिती ज्या मानानें असते त्या मानानें भारतांतील भिन्न भिन्न भाषांतील साहित्यिकांची वा








साहित्याची माहिती असत नाहीं. आमच्या सुशिक्षितांचें हें अज्ञान प्रादेशिक भाषांच्या उपेक्षेला कारणीभूत होत आहे. या प्रकारच्या अज्ञानामुळें संकुचितपणा आणि वृथाभिमान हे दोष सुद्धां घर करून राहिलेले आढळतात. भारतांतील सुशिक्षितांना भारतीय भाषांतील साहित्याची आणि कलांची सुव्यवस्थित माहिती करून देण्याचें काम आंतरभारतीनें अंगिकारलें आहे. या कार्मी जाणत्यांचें लक्ष वेधलें जात आहे गेल्या पांच वर्षांत भारतांत ही प्रवृत्ति वाढूं लागलेली दिसते. मासिकांतून आणि साप्ताहिकांतून भारतीय भाषांतील साहित्याचा परिचय करून देणारे लेख दिसूं लागले आहेत. व्याख्यानमालांतून देखील अशीं व्याख्यानें घडविण्याचें धोरण आढळतें. केंद्र-सरकारनें ज्या निरनिराळ्या 'अकादमी' निर्माण केल्या आहेत त्यामुळें परस्पर परिचयाचें कार्य चांगलें सुरू झालें आहे असें म्हणतां येईल. प्रादेशिक भाषांचीं विद्यापीठेंहि या कामांत लक्ष घालूं लागलीं आहेत. त्यामुळें आंतरभारतीची कल्पना आतां सानेगुरूजींच्या आंतरभारती—संस्थेइतकीच मर्यादित राहिलेली नाहीं, हें एक शुभ लक्षणच मानलें पाहिजे. सानेगुरूजींची कल्पना अगदीं योग्य वेळीं महाराष्ट्रांत निर्माण झाली असें म्हणतां येईल.

### भाषा व साहित्य यांची ऐक्यसंवर्धक शक्ति

भारतांत नानाप्रकारच जातिभेद, धर्मभेद आणि पंथभेद आहतच. त्यांतच भाषाभेदाचीहि भर आहे असें कित्येकांना वाटतें. परंतु भारतीय भाषांच्या इतिहासाकडे लक्ष दिलें तर असें आढळून येईल कीं भारतांतील आधुनिक भाषांनीं लोकमानसाला एकतेचे संस्कार देण्याचें महत्त्वाचें काम शतकानुशतकें केलें आहे. भारतांतील सर्व भाषांत मध्ययुगीन संतांनीं जें भक्तिसाहित्य निर्माण कल त्यामुळें भारतीय मनाला श्रद्धेची, सहिष्णुतेची आणि उदारतेची शिकवण मिळालेली आहे. रामायण, महाभारत, भागवत इत्यादि ग्रंथांचा आधार घेऊन भारतीय भाषांत पूर्वकाळीं विपुल ग्रंथरचना झालेली आहे. या साऱ्या रचनेनें भारतीय संस्कृतीची व्यापक एकता सर्वत्र फैलावलेली आढळते. अवैदिक आणि अहिंदु पंथांनीं देखील आपापल्या प्रदेशांत प्रादेशिक भाषांचा स्वीकार केल्यामुळें साहित्य हें भेदिलेल्यांना एकत्र आणणारें चांगलें आलंबन झालेलें आहे. कन्नड साहित्याचें उदाहरण या बाबतींत फार उद्बोधक ठरेल. कर्नाटकांत जैन, लिंगायत आणि वैष्णव असे पंथ आहेत. त्यांच्यांत पांथिक भेदभावना फार तीव्र आहे असेंहि म्हणतां येईल. पण कन्नड साहित्य हें या सर्वांना एकत्र आणण्याइतकें संपन्न आणि समर्थ आहे; कारण कन्नड साहित्याला या सर्वांनीं प्रतिष्ठा मिळवून देण्यांत आपली शक्ति वेंचली आहे कन्नड भाषेचा आदिमहाकवि पंप हा जैन आहे. तथापि साहित्याच्या अभ्यासकांमध्यें पंपाविषयीं परमप्रीति आढळते. मग ते स्वतः लिंगायत असोत वा वैष्णव असोत. बसव आणि इतर लिंगायत साधुसंत यांनीं वचन-साहित्य म्हणून एक नवाच साहित्यप्रकार कन्नड भाषेंत निर्मिला. त्याचें रसग्रहण करण्याच्या आड कर्नाटकांतील पंथभेद येऊं शकत नाहींत. वैष्णव दासाचें भक्तिसाहित्यहि कर्नाटकांत इतर पंथाय देखील आवडीनें वाचतात व ऐकून तल्लीन होतात. यामुळें कन्नड-भाषेनें कर्नाटकावर ऐक्याचे परिणाम घडवून आणिले आहेत, असें सहज दाखवितां येईल. बंगालमध्यें आधुनिक प्रकारचें काव्य निर्माण करण्याचा मान मायकेल मधुसूदन याला दिला जातो. 'मेघनादवध' या बंगाली श्रेष्ठ काव्याचा हा कर्ता धर्मानें खिस्ती होता हें प्रसिद्धच आहे. नजरुल इस्लाम या कवीचें बंगालमधील स्थान रवीन्द्रांच्या खालोखाल मानलें जातें. पूर्व बंगालमध्यें राजकीय फाळणीनंतरहि तेथील मुसलमानामध्यें बंगाली भाषेचें प्रेम मुळींच कमी झालेलें नाहीं. उलट, आपल्या जन्मभाषेचा अभिमान त्यांनीं अत्यंत तीव्रतेनें प्रकट करून दाखविला आह. इतर भाषांतहि अशा गोष्टी दाखवितां येतील. भाषा आणि साहित्य यांच्यामध्यें माणसांच्या मनांना एकत्र आणण्याची शक्ति फार विशेषत्वानें असते, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. साहित्याचा आस्वाद घेण्याची शक्ति वाढत गेली तर माणसांचीं मनें संकुचित भेदभावनेच्या पलीकडे जाऊं शकतील यांत शंका नाहीं.

म्हणून भारताच्या भिन्न भिन्न प्रदेशांत भारतीय भाषांच्या अभ्यासाच्या प्रवृत्ती निर्माण झाल्या पाहिजेत. नागरी लिपीचा स्वीकार केला असतां, द्राविड भाषा वगळल्या तर बाकीच्या भारतीय भाषांतील साहित्याचा परिचय सुलभतेनें होऊं शकतो असा आंतर-भारतीचा







अनुभव आहे. भारतीय भाषांचा व साहित्याचा अभ्यास वाढला तर भारतीय एकतेच्या भावनेला अधिक बळकटी येईल. सत्तेचे व स्वार्थाचे लोभ कमी करण्याच्या कामींहि साहित्याचा थोडाफार उपयोग होईल. साहित्यनिष्ठा भारतांत पसरविण्याची सध्यांच्या काळीं तांतडीची गरज आहे.

## तुलनात्मक अभ्यासाची जरूरी

रामायणाची व भारताची कथा संस्कृतांत आहे तशीच भारतीय भाषांनीं ठेवलेली नाहीं. तुळशीदासानें निर्मिलेलें रामायण एका ढंगाचें असलें तर बंगालींतील कृत्तिवासाचें रामायण अगदींच वेगळया स्वरूपाचें आहे. कृष्णभक्ति एकच पण तिचा आविष्कार भिन्न भिन्न भाषांत भिन्न भिन्न रीतींनीं झालेला आहे. ही भिन्नता त्या त्या प्रदेशांतील समाजजीवनाचीं वैशिष्ट्यें दर्शविणारी आहे प्रादेशिक भाषांतील रामायणाच्या तुलनात्मक अध्ययनानें आपलें भारतीय समाजाचें ज्ञान अधिक सुस्पष्ट होईल. संतांच्या वाङ्मयांतहि जागोंजाग वैशिष्ट्यें आहेत. कोणी मूर्तिपूजाविरोधी आहेत, कोणी मूर्तिपूजेचे समर्थक आहेत. कोणी चातुर्वर्ण्य-विरोधी आहेत, तर कोणी चातुर्वर्ण्याचे पुरस्कर्ते आहेत. म्हणून संतांच्या साहित्यांचा तुलनात्मक अभ्यासहि अभ्यासकाचा दृष्टिकोण निःसंशय विशाल करणारा ठरेल. पूर्वकाळीं दळणवळणाचीं साधनें फारशीं नसतांहि आपले पंडित आणि संत फार प्रवास करीत असत आणि त्यामुळें त्यांना भारताचें विविध प्रकारचें ज्ञान झालेलें असें. आज प्रवासाचीं आणि अध्ययनाचीं साधनें वाढलीं असूनहि परस्परांच्या परिचयाची प्रवृत्ति थोडी कमीच झालेली आढळते. महाराष्ट्राच्या मुक्तेश्वराला कर्नाटकाच्या कुमार-व्यासाचा परिचय होता. कुमारव्यासाच्या कन्नड महाभारतांत कित्येक मराठी शब्द आढळून आलेले आहेत. त्या मानानें आजच्या लेखकांमध्यें वा अभ्यासकांमध्यें हें परस्पर ज्ञान थोडें कमी झालेलें आढळून येईल. ही उणीव आतां आपण झपाट्यानें भरून काढली पाहिजे. त्यासाठीं भारतीय भाषांतील साहित्यांचा व साहित्यिकांचा परस्परपरिचय वाढविण्याचें काम आपण हातीं घेतलें पाहिजे. यामुळें आपलें भारतीयत्व अधिक सुदृढ बनेल. आपल्यामध्यें परस्पर सहकाराच्या कल्पना वाढत जातील. एकमेकांबद्दल प्रेम आणि आदर हे गुण वृद्धिंगत होतील व आपल्या प्रज्ञेला आणि प्रतिभेला नवेनवे अंकुर फुटतील.

'आंतरभारती'च्या उद्घाटनासाठीं दोन वर्षांपूर्वी पुण्यास प्रख्यात कन्नड साहित्यिक श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांना बोलावण्यांत आलें होतें त्या वेळीं प्रत्यक्ष परिचयानें स्नेहभावना वाढीस लागते ह्याचें चांगलें प्रत्यंतर आलें. महाराष्ट्रांतील मुख्य मुख्य शहरीं गेल्या दोनतीन वर्षांत आंतरभारतीकेन्द्रें स्थापन झालीं आहेत. तेथें रवीन्द्रांचें बंगाली साहित्य नागरी लिपीच्या द्वारें अभ्यासिलें जात आहे. नमुन्यासठीं रवीन्द्रांचा 'कर्ण-कुन्ती-संवाद' नागरी लिपींत मराठी अनुवादासह प्रकाशित करण्यांत आला आहे. साहित्याच्या द्वारा भाषेचें अध्ययन करण्याची एक नवी पद्धति या केंद्रांतून मान्यता पावत आहे. आंतरभारती-संस्थेनें अलीकडे उर्दू साहित्याचा परिचय करून देणारे दोन छोटे ग्रंथहि निर्माण केले आहेत. अहमदाबाद येथें उमाशंकर जोशी यांच्यासारख्या गुजराती साहित्यिकांनीं पुढाकार घेऊन आंतरभारती केंद्र स्थापन केलें आहे. अशीं केन्द्रें भारताच्या सर्व प्रदेशराज्यांत स्थापन झालीं तर परस्पर-परिचयाचें व स्नेहसंवर्धनाचें कार्य वाढीस लागेल यांत शंका नाहीं.

---

## लपलेले शिंपेच्या पोटीं —!

लपलेलं शिंपेच्या पोटीं
नको मला तें स्वातीचें जल
समीप माझ्या नित्य असो पण
झुळझुळत्या पाण्याचा ओहळ !

समोर माझ्या कधीं नसावी
झगमगती शुक्राची तारा
मंद परंतू अचल अशा त्या
पुरे ध्रुवाचा मला इशारा !

गंध नको मज निशिगंधाचा
प्राजक्ताचा नको फुलोर
फक्त हवी पण जीवनदायी
शीतलशी वाऱ्याची फुंकर !

— बाबा मोहोड








श्री. प्रेमा कंटक

# हिमालयाची हांक !

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा हिमालयो नाम नगाधिराजः ।

पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य स्थितः पृथिव्या इव मानदण्डः ॥

— कालिदास

अध्ययनकालांत कविकुलगुरु कालिदासाच्या कुमारसंभव – काव्याचें मंगलाचरण वरील श्लोकानें झालेलें वाचलें, तेव्हां त्यांतील उत्तुंग व भव्य भावनेनें अन्तःकरण भरून गेलें ! बालपणीं हिंदुस्थानच्या मर्यादा घोकीत असतां उत्तरेस हिमालय पर्वत प्रचंड भिंतीसारखा उभा आहे ही माहिती माझ्या बाल-मनाला एक काव्यमय चमत्कृति वाटत होती. तो हिमानें झांकलेला असतो म्हणून त्याला हिमालय हें नांव पडलें, असेंहि गुरुजनांनीं सांगितलें होतें ! पुढें पुराणें ऐकण्याचा व वाचण्याचा काळ आला. हिमालयाच्या पोटीं सतीनें अवतार घेऊन, तपश्चर्या करून शिवाला वरलें. हिमालयाच्या एका उंच शिखरा-वर शिव-पार्वतीचा वास असतो; त्यास कैलास म्हणतात. गंगा हिमालयावरच प्रथम अवतीर्ण झाली ! भगवान् शंकरानें तिला तेथेंच आपल्या मस्तकावर धारण केलें. अर्जुन पाशुपतास्त्राच्या प्राप्तीसाठीं तपश्चर्या करण्यास तेथेंच गेला होता. शेवटीं शेवटीं **श्रीशंकराचार्य, समर्थ रामदासस्वामी, स्वामी विवेकानंद** आदि महान् साधुपुरुषांनीं तेथेंच वास्तव्य करून ज्ञान व सिद्धि यांची प्राप्ति करून घेतली.– इत्यादि कथा ऐकून व वाचून हिमालयाच्या निर्मल व भव्य सौंदर्याबद्दल, तेथील पवित्र वातावरणाबद्दल व तेथें राहून तपाचरण करणाऱ्या ऋषिमुनींबद्दल एक रमणीय पण अस्पष्ट चित्र मनावर उमटलें होतें. सामान्यपणें सर्व हिंदूंच्या मनांत जी भावना मूर्त वा अमूर्त रूपांत राहाते, ती माझ्याहि मनांत प्रादुर्भूत झाली : “ आपणहि त्याच्या दर्शनास व शक्य तर आश्रयास गेलें पाहिजे ! ”

बालपणांतील मधुर स्वप्न तेथेंच राहिलें. काळ जाऊं लागला, तसतसा तारुण्यांतील पुरुषार्थाचा आनंद व उन्माद डोळयांत शिरूं लागला. देशांत पसर-लेल्या गुलामीच्या निरपवाद साम्राज्याचा अंत आण-ण्याच्या कामीं आपली शक्ति संपूर्णपणें लावावी अशी उत्कट भावना मनांत स्फुरूं लागली. **महात्मा गांधीं-**सारखा अध्यात्मवीर या धर्मयुद्धाचा सेनानी होऊन उभा ठाकला होता. त्यांचें जबरदस्त आकर्षण मनाला झालें ! अध्यात्मवृत्ति आणि वीरवृत्ति या दोहोंचा परि-पोष त्यांच्यांत भरपूर होता. मी तर प्रथमपासून या वृत्तींची पूजारी होतें. त्यांचें अलौकिक विभूतिमत्त्व पाहून ते एक मानवी हिमालय आहेत अशी श्रद्धा मनांत निर्माण झाली. त्यांच्या मार्गदर्शनाखालीं राहून आपला जीवनविकास करून घ्यावा व देशसेवा करावी अशा इच्छेनें मी त्यांची भेट घेतली, पत्रव्यवहार केला आणि २६ मे १९२९ रोजीं त्यांचेच समवेत त्यांच्या सत्याग्रहाश्रमांत दाखल झालें.

महात्माजी महान् पुढारी होते त्याप्रमाणें महान् गुरुहि होते. केव्हांतरी स्वातंत्र्यासाठीं सत्याग्रहयुद्ध लढावें लागेल, त्यांत आपणहि भाग घ्यावा व त्यासाठीं जरूर ती तालीम घ्यावी या उत्कट इच्छेनें मी त्यांच्या आश्रमांत गेलें होतें. सत्याग्रहासाठीं योग्य तालीम घेणें जरूर आहे, असें माझें मत होतें. महात्माजींनीं शिकविलें कीं युद्ध हें सत्याग्रहाचें एक अंग आहे. मानवाचें जीवनच पूर्णपणें सत्याग्रही बनलें पाहिजे. जीवन कृतकृत्य करण्यासाठीं धर्मतत्त्वांचें पालन उग्रपणें झालें पाहिजे. धर्म हें वीरांचें लेणें आहे. त्याच्याशिवाय आत्मशुद्धि व समाजशुद्धि होणार नाहीं. ही दीक्षा घेत-








त्यावर मग

'रात्रिदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग
अंतर्बाह्य जग आणि मन ।
जीवाही आगोज पडती आघात
येऊनियां नित्य नित्य वारूं ॥ '

अशा प्रकारचें नित्य नवें अंतर्गत अद्‌भुत युद्ध सुरूं झालें ! वर्षें गेलीं, माझी साधनाच जडतर होत चालली. सत्याग्रहयुद्धाच्या अद्‌भुतरम्य कल्पनेनें भाळून मी महात्माजींच्या आश्रमांत प्रविष्ट झालें होतें. संजीवनी-विद्येच्या प्राप्तीसाठीं घरदार, प्रांत, भौतिक सुखें, मानप्रतिष्ठा सर्वांचा मोह सोडून दिला होता. सहस्र वर्षांच्या साधनेचें घन बनूं शकणाऱ्या 'प्रणया'कडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. साधना करीत असतांना माझा गुरूच माझें एकमात्र लक्ष्य व जीवन-सर्वस्व बनला. त्याचा प्रभाव एवढा महान् होता कीं त्याच्या समोर इतर माणसें लहान वाटूं लागलीं ! त्याची मोहनी इतकी जबरदस्त होती कीं, माझ्या निसर्गमुग्धावस्थेंत त्याचें वैराग्यहि मधुर वाटूं लागलें. त्यांनीं शिकविलेली जीवननिष्ठा आचरणांत आणण्याचा प्रयत्न करणें हीच माझी तपश्चर्या आणि त्यांचें प्रसन्न हास्य हेंच माझें उत्तम बक्षीस अशी भावना झाली !

महात्माजींच्या ह्यातींत माझ्या जीवनविकासाची चिंता मला बिलकुल वाटत नव्हती. भावनेच्या उमाळ्यांत माझ्या एका जन्मदिवशीं माझें जीवन मीं त्यांना अर्पण केलें व त्यांनींहि त्याचा स्वीकार केला. " आतां मी तुझ्या जीवनास वळण लावीन, तें माझें आहे " असें ते म्हणाले. त्यांनीं भार घेतल्यावर मग मी चिंता कां करावी ? सत्याग्रहाश्रम बंद झाला. महात्माजी सेवाग्रामला जाऊन राहिले. मी सासवडास आलें. तरी वर्षांतून दोनतीनदां तरी त्यांच्या भेटीची सुसंधि मिळत असे. पत्रव्यवहार सतत चाले. त्यांतून खूप प्रेरणा व आनंद मिळत असत.

या जीवनांत देखील हिमालयाचें विस्मरण झालें नव्हतें. लखनौच्या काँग्रेस - अधिवेशनसमयीं झोन तिकीटाचा फायदा घेऊन मी उत्तरप्रदेशांत खूप प्रवास केला होता तेव्हां हरिद्वार व ऋषिकेशपर्यंत जाऊन आलें होतें. ऋषिकेश येथें हिमालयाच्या मांडीवरून खालीं उडी घेणाऱ्या व पृथ्वीवर स्वच्छंद विहार करणाऱ्या गंगामातेच्या पावन जलांत मीं स्नान केलें तेव्हां भव्यतेची साक्षात् मूर्ति जो हिमालय त्याचें दर्शन प्रथमच घडलें होतें ! पण मला कबूल केलें पाहिजे कीं, मला तें खरें दर्शन वाटलें नाहीं. कारण तो पहाड बर्फाच्छादित नव्हता. महाराष्ट्रांत सह्याद्रि पर्वत देखील असें भव्य दर्शन पुष्कळ ठिकाणीं देतो ! हिमालयाचें वैशिष्ट्य पहावयाचें तर खूप आंत गेलें पाहिजे. ती इच्छा तेव्हां अतृप्त राहिली.

दरम्यान आचार्य कालेलकरांचीं पुस्तकें ' हिमालयाचा प्रवास ' व लोकमाता ' हीं वाचलीं. " नसांनसांतून व रोमांरोमांतून चेतना उत्पन्न करणारा शीतल मधुर वारा जेथें वाहातो, जेथें वनश्री आपल्या यौवनाचा पूरेपूर उन्माद प्रगट करते, जथें पर्वत आपल्या सौंदर्यानें हा खरोखरच पर्वत आहे कीं रंगभूमीवरील पडदा आहे अशी शंका मनांत उत्पन्न करतो, आणि जेथील शांति चैतन्यानें गजबजलेली असते " अशा प्रकारचें वर्णन त्या पुस्तकांतून वाचल्यावर मन पुन्हां उत्कंठित झालें कीं काकासाहेबांप्रमाणें आपणहि हिमालयांत पायीं यात्रा करून यावें. मनांतील इच्छा मी एके दिवशीं श्री. शंकरराव देवांना बोलून दाखवली : " आपण हिमालयांत कां जाऊन येऊं नये ? "

ते म्हणाले, " जरूर ! दोघही जाऊं, सोबत तिसरे स्वामी आनंद. त्यांना तो प्रदेश परिचित आहे. आपण तिघे पायीं चालत जाऊं. "

त्यांचे शब्द मी पकडून ठेवले आणि एकदां स्वामी आनंद सासवडला आश्रमांत आले असतां त्यांचेजवळ हिमालयांत जाण्याची गोष्ट काढली. शंकररावहि हजर होते. स्वामींनी लगेच संमति दिली व " येत्या मे महिन्यांत तिघेंहि निघूं या; मला लिहा. " असें म्हणाले. ही घटना १९४४ नंतर केव्हां तरी झाली. पण ती कल्पना अमलांत मात्र येऊं शकली नाहीं.

पुन्हां काळ निघून गेला. जगांतील भीषणयुद्ध व संघर्ष पाहिले. आणि १९४८ च्या जानेवारीच्या ३० तारखेस धर्मात्माचें बलिदान झालें ! त्या घटनेनें माझ्या जीवनावर प्रचंड आघात केला ! ' मरणं प्रकृतिः शरीरिणाम् ' हा नियम माहीत असला तरी मरणाच्या प्रत्यक्ष दर्शनानें मन भयभीत व व्याकुल होत असतें हेंहि सत्य आहे. महात्माजींच्या खुनानें मला दुहेरी आघात बसला ! ईश्वरावर माझी अपार श्रद्धा होती. 'न मे भक्तः प्रणश्यति ' या वचनावर मी शब्दशः








विश्वास ठेवला होता. पिकलेल्या फळाप्रमाणें शरीर गळून पडतें हें समजूं शकतें. पण त्यांचा निर्घृण खून व्हावा, या घटनेचा अर्थच कळला नाहीं ! मन व्यग्र झालें व अन्तःकरणांत द्वंद्व सुरूं झालें. वर्षभर तरी काळ अंतर्गत द्वंद्वांत गेला. श्रद्धा टिकली पण ईश्वरशरणतेची गरज अधिक भासूं लागली महात्माजी जाण्यापूर्वी मला कस्तूरबा-ट्रस्टचें काम सोंपून गेले होते. त्याशिवाय काँग्रेस-स्त्री-संघटना-समिति व इतर कार्येंहि हातांत होतींच. कामांत चित्त गुंतविण्याचा प्रयत्न चालू ठेवला आणि तो त्याकाळापुरता सफलहि झाला. मद्याच्या नशेंत दुसरें कांहीं आठवत नाहीं. एका नव्याच जगांत मद्यपी वावरत असतो, क्रिया नकळत चालू असतात. तसेंच कांहींसें झालें !

सत्याग्रहाश्रमांतून बाहेर पडल्यावर माझी कर्मप्रवणता चालूच होती. निरनिराळीं विधायक कार्यें, सेवादलें, दौरे, प्रचार, लेखन, काँग्रेसकार्य, सात वेळां तुरुंगवास, याप्रमाणें निरनिराळ्या प्रवृत्तींतून आयुष्य खर्चिलें जात होतें. 'ह्या सर्व प्रवृत्ती कशासाठीं ?' ह्या प्रश्नास स्वातंत्र्य मिळेपर्यंत, ' देश स्वतंत्र व्हावा म्हणून ही तपश्चर्या चालली आहे " असं उत्तर देतां येई. पण देशासाठीं तपश्चर्या करतांना स्वतःबद्दल कांहींच योजना नव्हती काय ? होती. सेवेंतून आत्मशुद्धि झाली पाहिजे, असें मनाला वाटत होतें. मनुष्य जन्माला आल्यापासून मरेपर्यंत समाजाच्या ऋणावर जगत असतो. समाजाची सेवा करून त्यानें त्या ऋणाचा अल्प तरी परिहार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें मनांत वाटत होतें. मानवांच्या सेवेंतून ईश्वराची सेवा होते या वृत्तीनें सेवा करीत गेल्यास चित्तशुद्धि होत जाते, अशी महात्माजींची शिकवण होती. हिंदुधर्मांतील प्राचीन कल्पना-- भुकेलेल्यांना अन्न देणें, तृषार्तांना पाणी देणें, धर्मशाळा किंवा अन्नछत्रें बांधणें, अनाथांना मदत करणें, निराश्रितांना आश्रय देणें—या मार्गे पडून संघटित संस्थांतर्फे संघटितपणें समाजसेवा करण्याचा पायंडा पडला होता. महात्माजी तर संघटनेचे श्रेष्ठ शिल्पकार होते. त्यांनीं अनेक संस्था उभ्या केल्या होत्या. बलिष्ठ इंग्रज-साम्राज्यशाहीशीं झुंजण्याकरितां त्यांनीं काँग्रेससारखी संस्था लढाऊ बनविली आणि विधायक कार्यासाठीं कार्यकर्त्यांची पलटण तयार केली. समाजसेवेच्या विधायक प्रवृत्ती त्यांच्या मताप्रमाणें चतुर्दशविध होत्या. त्या आणखीहि वाढूं शकत होत्या. त्यांच्या बहुविध कार्यक्रमांची चर्चा रात्रंदिवस देशांत व परदेशांत चालूच होती व मीहि त्या प्रवाहांत वहात होतें.

आज पंचवीस वर्षें त्या प्रवाहांत घालविल्यावर मनांत विचार स्फुरतात ते हेः समाजपूजेचा हा एक नवा संप्रदाय उत्पन्न झाला आहे कीं नाहीं ? संघटित पद्धतीनें संस्थांच्या द्वारा ' समाजसेवा ' केल्यानें मोक्षाचें द्वार खुलें होतें कीं काय ?

अलबत्, माझें कर्तृत्व थोडेंफार वाढलें आहे. बुद्धिशक्तीचाहि थोडा फार विकास झाला आहे. पण यांतून ध्येय काय साधलें, तें विचार करण्यासारखें आहे. देशाला स्वातंत्र्य मिळेपर्यंत 'देशाचें स्वातंत्र्य' हें ध्येय होतें. स्वातंत्र्य मिळाल्यावर समाजांत ' समता ' प्रस्थापित झाली पाहिजे, हें घोषणावाक्य आम्ही सतत उच्चारीत आहोंत. समाजोन्नतींत आत्मोन्नति समाविष्ट आहे काय ? आणि समाजसेवेंतच जर व्यक्तीचा मोक्ष ग्रहीत धरला तर मोक्षासाठीं मानवाला सेवेची संधि मिळावी म्हणून समाज नेहमीं पंगु राहिला पाहिजे हें ओघास येत नाहीं काय ? समाजांत लोक जितके अपंग, तितकी सेवकांना सेवेची अधिक संधि मिळते, तितका मोक्ष त्यांच्या जवळ येतो आणि समाजसेवेसाठीं संघटना प्रस्थापित झाल्या कीं समाजसेवेचें काम व्यवस्थितपणें चालतें ! अशा पद्धतीनें समाजसेवेला धंद्याचें रूप येत नाहीं काय ? समाजासाठीं स्वात्मार्पण करणाऱ्या व्यक्तीचें सत्त्व वाढतें. पण त्यामुळें समाज पुष्ट होत नाहीं. समाजाची शक्ति त्याच्या स्वावलंबनानेंच वाढेल. म्हणून समाजसेवा हें मानवाचें ध्येय असूंच शकत नाहीं. आत्मोन्नति साधण्यासाठीं तें कांहीं प्रमाणांत साधन होऊं शकतें.

कसेंहि असो, दोन तपांपेक्षां अधिक काळ समाजसेवेंत गेला. पण आत्म्याचा विसर पडला नाहीं. त्याचेकडे लक्ष देण्यास मला फुरसत मिळाली नाहीं हेंहि खरें आहे. संघटनेमार्फत समाजसेवा करीत असतांना व्यक्ति यंत्र बनूं लागते असा अनुभव मात्र भरपूर आला. अर्थात् यांत दोष माझाच होता. मधून-मधून तुरुंगवास होई तेव्हां वाचन मनन वगैरेसाठीं थोडा तरी समय मिळत असे. त्यामुळें मला फार बरें वाटत असे. एकदां तुरुंगांतून बाहेर आल्यावर मीं महात्माजींना लिहिलें कीं, " मला वाटतें, वर्षांतून








एक महिना तरी एकांतवास, विजनवास केला पाहिजे. त्यामुळें नवजीवन मिळतें." पण महात्माजींची विचारसरणी वेगळी होती. जनता जनार्दन आहे, तिच्यापासून दूर जाऊन जीवनाची प्राप्ति कशी होणार ? भोंवतालचें दैन्य व दुर्गति यांचा निरास करण्यासाठीं सेवकानें सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. त्यांतूनच आत्म्याचा विकास होईल असें ते मानीत.

माझीं मतें कशींहि असलीं तरी महात्माजींच्या वचनांवर माझी श्रद्धा होती. शिवाय त्यांच्या सहवासांत थोडा समय असलें तरी नवचैतन्याची प्राप्ति होत असे. सारा शीण क्षणार्धांत उतरून जाई !

'अन्यक्षेत्रे कृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति ।'

अशी माझी भावना त्यांच्याबद्दल होती. त्यामुळें त्यांच्या निर्वाणानंतर माझ्या जीवनांत जी पोकळी निर्माण झाली, ती कशानेंहि भरून येईना ! सेवा मात्र त्याच पद्धतीची चालू राहिली. विषय वाढले, कमी होईनात. आश्रम व 'कस्तूरबा-ग्रामसेविकाविद्यालय' यांचा पसारा वाढला. इमारती, शेती, बाग, गुरें, हरिण, कुत्रे आणि माणसें यांची संख्या वाढत गेली, तसतशी कामाची जबाबदारीहि वाढत गेली. आश्रमाची मूळ कल्पना अशी होती कीं, आदर्श सत्याग्रही होण्यासाठीं स्वतःचें संपूर्ण जीवनपरिवर्तन करण्यास सिद्ध झालेल्या आणि परिवर्तनानंतर स्वतःचा धर्म समजून अमुकच प्रकारचीं कामें करण्याची दीक्षा घेऊं इच्छिणाऱ्या लोकांचा तो कायम स्वरूपाचा संघ बनावा ! पुढें महात्माजींनीं शरीरश्रमांतून स्वावलंबी होण्याचें व्रत पाळण्याचा आदेश दिला. त्यानंतर वाचन-श्रवण-मननास फुरसत कोठली राहाणार ? आणि कार्यकर्त्यांत थोडेसें कर्तृत्व व काम करण्याची वृत्ति असली कीं न सांगतां कामें धांवत येतात. सेवा एकांगी होऊं लागली.

मनुष्यांत जड व चैतन्य दोन्ही आहेत. पहिलें व्यक्त तर दुसरें अव्यक्त व गूढ आहे. चैतन्याची शक्ति अमर्याद असली तरी ती दिसत नाहीं. जड मात्र आपल्या सर्व कलांनीं प्रकाशमान होत असतें. त्यामुळें सामाजिक जीवनांत पुरुषार्थ व प्रगति बाह्य चक्षूंना दिसून येतात. मला तर आंतून अत्यंत असंतोष वाटत होता. आत्मनिरीक्षण सतत चालू होतें. महात्माजी गेले त्या वर्षी मी रोजनिशी लिहिण्यास प्रारंभ केला होता. जीव गुदमरल्यासारखा होई. स्वतःच्या कच्चेपणाची लाज वाटे. आपली आध्यात्मिक वाढ होत नाहीं असें वारंवार मनास वाटे. आणि त्यामुळेंच हिमालयाकडे धांव घेण्याची उत्कंठा वाटूं लागली.

१९५३च्या सप्टेंबरमध्यें मीं कांहीं कामासाठीं दिल्लीस गेलें होतें. तेथ राजकुमारी अमृतकौर यांनीं एके दिवशीं मला आपलेकडे भोजनास बोलावलें. बोलतां बोलतां त्यांनीं मला आग्रहपूर्वक सांगितलें कीं, "तूं जरूर परदेशला जा. सर्व देश पाहून ये. तेथें खूप शिकावयास मिळतें. मी तुझ्यासाठीं सर्व सोयी करून देतें." मी नकार देऊन म्हटलें, "मला परदेशीं जाण्याची इच्छा नाहीं. मला हिमालयांत जावयाचें आहे." त्या थोडी नाराजी दाखवून म्हणाल्या, "ऊफ् ! इसमें क्या है ? जाओ, शिमलेमें मेरा बंगला है । वहाँ जाके ठहरो । दिल चाहे उतना समय रहो । हिमालय देखनेको मिलेगा ।" त्यांना काय ठाऊक ! मला आराम घ्यावयाचा नव्हता, विलासही करावयाचा नव्हता ! हिमालयांत जाऊन साधना करण्यासाठीं मन उत्सुक झालें होतें.

पण शेवटीं ईश्वरकृपेनें ती संधि आली. माझ्या कामांची जबाबदारी हळूहळू कमी होत चालली. साधनें जुळलीं, माणसें मिळालीं, कांहीं कामें पूर्ण झालीं. कांहीं गुंडाळून टाकलीं. कस्तूरबा ट्रस्टचें काम लायक कार्यकर्त्यांना सोंपून दिलें. मी मोकळी झालें ! हिमालयाची हांक स्पष्टपणें ऐकूं येऊं लागली !

हिमालयांत जाऊन काय करणार ? जीवनाचें रहस्य शोधावयाचें आहे. जीवनांतील चैतन्य कोठून येतें त्याची जिज्ञासा आहे. मनांत नाना प्रकारचे संकल्प-विकल्प उठतात, क्षोभ होतो, त्यांना शांत करावयाचें आहे. ध्येयासाठीं धनदौलत, जातपात, सामाजिक प्रतिष्ठा, गौरव सर्व सोडलें. आतां प्रिय विषयहि सोडावयाचे आहेत. फुलाफळांनीं बहरलेला शांत, सुंदर आश्रम सोडावयाचा आहे. सव्वा महिन्याचें पिलूं असतांना येथें आणून जिचें पालन-पोषण व वर्धन केलें, मी खाऊं घातल्याशिवाय जी खात नाहीं, नाहीं मी दिसलें तर जी बेचैन होते, मला दुरून पाहून जी ओरडते व मजकडे झेंप घालते, माझ्यामागून कुलुंग्या कुत्र्यासारखी लुटुलुटू पळत येते, ती गोड हरिणी शुचि — तिलाहि सोडावयाचें आहे. लिलि,








कलावती, रूपा आणि नवी कालवड सीता–जी शुचीच्या जोडीनें माझ्या प्रेमाचें स्थान बनली आहे, जिचे सुंदर पाणीदार डोळे मजकडे मधुर भाव व्यक्त करीत पहात असतात, जिच्या क्रीडांनीं माझें मन हेलावूं लागतें, तिलाहि सोडावयाचें आहे. आमचे शेतींतील सहकारी जय, विजय, नन्दन व माधव रोज माझें स्मरण करतील. करूं द्यात. त्यांचाहि मोह नको. बागेंतील विविध वेली, रोपटीं, फलवृक्ष हे माझ्या जीवनाचीं अंगें बनलेले सर्व विषय सोडून आसक्तीवर विजय मिळवितां येतो किंवा नाहीं तें पहावयाचें आहे. विनोद आणि रसिकता, स्नेही व सहकारी सर्वांपासून दूर राहून हिमालयाच्या अमृतसंजीवनींत अवगाहन करण्याची इच्छा मन सेवीत आहे. आध्यात्मिक शक्तीची उपासना करावयाची आहे.

कित्येक स्नेह्यांनीं, विचारलें "आपल्या तत्त्वज्ञानाशीं हें विसंगत नाहीं काय ?" स्व. किशोरलालभाई म्हणत : "I do not believe in dying in harness" मरेपर्यंत काम ! काम !! काम !!! सेवेच्या जोखडाला सतत जुंपलेलें असणें योग्य नाहीं. त्याची आवश्यकताहि वाटत नाहीं. शास्त्रकारांनीं मानवी जीवन चार आश्रमांत विभागून टाकलें आहे. पन्नाशीची झुळूक लागली कीं वानप्रस्थाश्रमाचा आश्रय करावा, असा त्यांचा आदेश आहे. मी त्याच दशेंत सध्यां आहे.

'कृतांतकटकामलध्वज जरा दिसों लागली
पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली ।'

तारुण्यांतील बहुमोल वर्षें जनतेच्या सेवेस अर्पण केलीं. आतां जोंवर शरीर चालतें तोंवर परमार्थाचा कांहीं विचार कां करूं नये ? – असे विचार मनांत येतात. समाजाबद्दल कंटाळा वा द्वेष नाहीं. समाज उदार आहे. माझ्या क्षुद्र सेवेची त्यानें आतांपर्यंत पुष्कळच कदर केली आहे. समाजसेवकाला भोगाव्या लागणाऱ्या वैयक्तिक अडचणी मी कधींच अनुभवल्या नाहींत. माझ्या दोषांकडे जनतेनें उदार दृष्टीनें पाहिलें आहे. आत्मशुद्धीसाठीं मी वारंवार लहानमोठ्या मुदतीचे उपवास केले आहेत. दर खपेस सभोंवतालचीं माणसें या उपासांचें फारच कौतुक करीत. जणुं काय ख्रिस्ताप्रमाणें साऱ्या मानवजातीचें पाप मी आपल्या बलिदानानें धुवून काढीत होतें, अशी भावना ते दाखवीत ! लोकांच्या अतीव कौतुकाचा मला वारंवार संकोच वाटत आला आहे. त्यामुळेंच माझे दोष समाजापासून लपवून ठेवण्याचा प्रयत्न मी कधींच केला नाहीं. वारंवार वाटतें कीं, लोकांना माझें अंतरंग दिसत नाहीं, तें साफ उघडें करून दाखवावें म्हणजे भ्रमनिरास होईल. आश्रम, पेहेरवेश आणि दिनचर्या हीं बहुधा जनतेला भ्रमांत टाकतात. लोक कल्पना करतात त्यापेक्षां सेवकाचें सत्त्व कितीतरी कमी असतें. पण पहातो कोण ?

हिमालयांत गेल्यावर मला जें हवें तें मिळेल काय ? – चिकित्सक बुद्धीचे स्नेही हाहि प्रश्न विचारतात. संतकवींनीं त्याचेंहि उत्तर देऊन ठेवलें आहे :–

'नाथ यती अरु जोगी जंगम
ढूँढ रहे वनमांही ।
भेख धरे धरती भ्रमिहारे
तिनहू दरसी नाहीं ॥'

'शतकानुशतकें नाना संप्रदायांचे साधक रानोंमाळ फिरत असतात, तपश्चर्या करतात, पण त्यांना परमेश्वरदर्शन होत नाहीं.' पण गोपींची तारीफ !

'सो हम ग्रह ग्रह नाच नचाई ।
तनक तनक दधि देके ।'

त्या सर्वसमर्थ परमेश्वराला थोड्याशा दह्यासाठीं गोपींनीं नाचावयास लावलें ! माझें मन विचारतें : कृष्णाचा अवतार गोपींसाठीं झाला कीं कंस-जरासंधांचा वध करावयासाठीं झाला ? दैत्यांच्या संहाराच्या निमित्तानेंच परमेश्वर अवतार घेतो. केवळ भक्ताच्या प्रेमासाठीं तो अवतार घेऊन येत नाहीं. निदान तसें नमूद नाहीं. मर्त्य देहांत ईश्वराला आणण्याचें श्रेय गोपींना आहे कीं दैत्यांना आहे ? –भक्तांमध्यें तो अविनाभावानें वसतो एवढें आश्वासन त्यांना पुरेसें आहे.

लहानपणीं ध्रुवाख्यानांतील पुढील ओळी मला फार आवडत :

'तुझी बुद्धि धाकुटी वय सान
तुला कैसें देईल दरशन ? ।
ध्रुव बोले त्यागीन मीही प्राण
जरी देईना हरी दरशन ॥'

ईश्वर दर्शन देणार नाहीं तर मी प्राणत्याग करीन, अशा निश्चयानें ध्रुव रानांत गेला. तसा निश्चय करून मी जात नाहीं. कारण मला ईश्वराकडून अढळपदहि








मिळवावयाचें नाहीं ईश्वराची मी आर्त भक्त नाहीं. मला त्याचेबद्दल अद्भुतरम्य कल्पना आहेत. त्या तरंगांत मी मस्त आहे ! सत्याग्रहाश्रमांत असतांना ऐकलेल्या एका गुजराती गीताचें स्मरण होतें. शब्द आठवत नाहींत. पण भाव आठवतो. कवि म्हणतो :

" हे ईश्वरा तूं दिलेलें घेऊन मी काय करूं ? मला जिंकण्याची हौस आहे. हारजीत देणारा खेळ आपण खेळत आहों. दोन हात होऊं द्यात ! होऊन होऊन काय होईल ?

' हारूं हुं हारूं तो जगतने हारूं
जीतुं तो तुजने नाथ ।
मारे नाथ, जीत्याना कोड ॥'

मी हरलों तर जग गमावून बसेन; जिंकलों तर हे स्वामी, तुझी प्राप्ति होईल. परिणाम कोणताहि आला तरी श्रेय माझेंच आहे ! "

तेव्हां हिमालयांत गेल्यावर त्या यात्रेचा व तेथील साधनेचा परिणाम काय येईल त्याची चिंता मला नाहीं. ईश्वरशरणतेंतून नम्रता येते. श्रद्धेचें बल असतेंच. ' नहि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ! '

## कोर !

निळया लोंकरी धूसर धूसर
उजळत यावी मेघांमधुनी
चवथीच्या चंद्राची कोर !

कृष्ण मूक छायांना बिलगत
पसरावें क्षण स्निग्ध चांदणें
किंचित् मादक, लाजत लाजत !

जरा चोरटी झुळुक वहावी-
स्वतःस विसरुन आणिक पानें
एक दुज्याच्या कुशित शिरावीं !

ढगांत फिरुनी कोर लपावी
आणिक विश्वाशीं तिमिराची
श्यामल ग्लानी फक्त उरावी !

—वि. ज. बोरकर.

## येऊं लागली गहिरी सांज !

आश्चर्यानें म्हणतो वृक्ष
" अशा अवेळीं कुठें निघाली
होउनि लांबट आणिक अवखळ
माझी प्रेमळ सखी सांवली ? "

हिरवी सळसळ मृदुल करांनीं
धरूं पाहते सावध होउन
हळुवारपणें निसटूं लागलें
झळाळणारें भरजरि वसन

क्षितिजाआडुनि येऊं लागल्या
मोहक रूपवती रंगछटा
बघतां बघतां गेला रंगुनि
कोंपऱ्यांतला मेघ एकटा

पेंगुळल्या पंखांची झेप
शांत निवारा शोधुं लागली
शुभ्र तरंगासम गगनांत
बलाकमाला चमकुनि गेली

निवांत झालेला पाणवठा
पाणी उडवित बसे जळांत
डोळे झांकुनि स्मरूं लागला
दिवसभराची गंमतजंमत

घरट्याघरट्यांतुनि डोकावुनि
अबल निराश्रित वारा थकला
कुठेंहि थारा न मिळे म्हणुनी
धरणीवरती लोळूं लागला

येऊं लागली गहिरी सांज
कालचीच अंगाई गात
मिटूं लागल्या नेत्रपाकळ्या
मुग्ध उद्यांच्या स्वप्नकुशींत !

— माधव गोविन्द काटकर







बर्ट्रंड रसेल

# विचारस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते जॉन स्टुअर्ट मिल

जॉन स्टुअर्ट मिल यांच्या नांवाशीं माझा संबंध अगदीं खूपच लवकर माझ्या बालपणींच आला, असें एका अर्थी म्हणतां येईल. माझे आई-वडिल सांप्रदायिक विचाराचे नव्हते. ते स्वतंत्र विचार करणारे होते. म्हणून माझ्या बॅप्टिस्माच्या वेळेला धार्मिक कर्मकांडाचा अवलंब करण्यांत आला नव्हता. तरी पण त्या विधीच्या वेळीं त्यांनीं मिलला माझे 'गॉड-फादर' मानलें. ते स्वतः मिलचे शिष्य आणि स्नेही होते. पुढें मी लहान असतांनाच आई व वडिल दोघेंहि निवर्तलीं. जर ते दीर्घकाळ जगले असते, तर मीहि मिलच्याच वैचारिक वातावरणांत वाढलों असतों, यांत शंका नाहीं.

### तत्त्वज्ञ असावा तर मिलसारखा !

मी १७ वर्षांचा होईपर्यंत मिलबद्दल मला कांहीं ठाऊक नव्हतें, कोणाकडून कळलेंहि नव्हतें. मग मात्र मीच आपण होऊन मिल वाचावयास सुरुवात केली. अंडर-ग्रॅज्युएट व्हायच्या आंतच मिलचीं 'पोलिटिकल एकॉनॉमी', 'लॉजिक', 'लिबर्टी', 'सब्जेक्शन ऑफ वुमेन' हीं पुस्तकें वाचून काढलीं. तत्त्वज्ञ असावा तर मिलसारखा असें वाटण्या इतका त्याच्या ग्रंथांचा माझ्यावर परिणाम झाला. म्हणून केंब्रिजला मी गेलों त्यावेळीं मिलनें भारला गेलेलों होतों. पण तेथें केंब्रिजला मिलला कोणी विचारीत नव्हतें. " मिल हा आतां मागें पडलेला आहे, आतां हेगेल हाच खरा तत्त्वज्ञ मानला जातो," असें मला तेथें सांगण्यांत आलें. कांहीं काळ मलाहि तें पटल्या-सारखें वाटलें पण तें कांहीं काळच. पण पुढें लवकरच मी पूर्वपदावर आलों. जर्मन तत्त्वज्ञानी हेच खरे आदरणीय अशी केंब्रिजची शिकवण होती. पण मिल हे जर्मन तत्त्वज्ञान्यांपेक्षां किती तरी पटींनीं थोर तत्त्वज्ञानी आहेत याबद्दल मला शंका राहिली नाहीं.

### माणुसकीनें संपन्न मनुष्य

इंग्लंडमधील अनुभववादी (empiricist) तत्त्वज्ञानपरंपरेला जें मिल यांनीं वळण लावलें तें तत्त्वज्ञानाचा शास्त्रशुद्ध विचार या दृष्टीनें जरी महत्त्वाचें नसलें तरी त्याचा प्रत्यक्ष व्यावहारिक परिणाम तत्त्वज्ञानावर फार महत्त्वाचा झाला. बेंथामचे अनुयायी, सर्व बेंथामवाद्यांचा पंथच इतका शुष्क तर्कटी बनला होता कीं, त्याला मानव्याची क्षितिच राहिली नव्हती. आपल्या तर्कशुद्ध युक्तिवादाचें पर्यवसान माणसाला अनंत हालअपेष्टा भोगायला लावण्यांत होणार आहे याबद्दल त्यांना विधिनिषेध नव्हता. मिलची वृत्ति मात्र अशी नव्हती. त्याचें अंतःकरण स्नेहार्द्र होतें. आपल्या तर्कटाचें पर्यवसान जर मानवाला हालअपेष्टा भोगायला लावण्यांत होणार असेल तर त्यांत कोठेंतरी चुकलें असलें पाहिजे असें त्यास वाटे व त्या तर्कशास्त्राची तपासणी करून ती चूक शोधून काढण्यास त्याची तयारी होती. इंग्लंडमधील अनुभववादी तत्त्वज्ञानपरंपरेला मिलनें स्नेहार्द्रतेची, माणुसकीची जोड दिली. तो स्वतः स्नेहार्द्र असून त्याच्यांत माणुसकीची भावना ओतप्रोत भरलेली होती. माणुसकी असलेला ( humane being) तो मनुष्य होय, ही माणसाची व्याख्या पुष्कळांना मान्य नाहीं. त्यांना वाटतें कीं, दुसऱ्याला मारण्याचें सामर्थ्य हेंच मनुष्यत्वाचें मुख्य लक्षण होय. डिस्रेली या मताचे होते. कार्लाइलची तर हीच निश्चित भूमिका होती. परंतु मिल अगदींच वेगळा होता. माणुसकीनें संपन्न असा तो मनुष्य होता.

मिलची मानसिक वाढ कशी झाली याचें दर्शन पॅक यांनीं लिहिलेल्या[1] जान स्टुअर्ट मिलच्या चरित्रा-

---

सुप्रसिद्ध इंग्लिश तत्त्वज्ञ जॉन स्टुअर्ट मिल ( जन्म : २० मे १८०६; मृत्यु : ८ मे १८७३ ) यांच्यावर बर्ट्रंड रसेल यांचें बी. बी. सी. वरून एक भाषण झालें. त्या भाषणाचा अनुवाद ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिसेस मुंबई, यांच्या परवानगीनें येथें दिला आहे. — का. सं.

1 " The Life of John Stuart Mill " by Michael St. John Packe ( Martin Secker and Warburg Ltd, London, 42 sh. ).








वरून होतें. जेम्स मिल यांच्या व्यक्तिमत्त्वाचें जॉन मिलवर किती भयंकर दडपण होतें याची त्या चरित्रावरून कल्पना येऊं शकते. वडिलांच्या या भयंकर दडपणामुळें मिल याचा तेजोभंग झाला. त्यामुळें त्याचें मूळचें स्वाभाविक प्रखर तेज कायमचें कमी झालें !

मिलच्या विचारसंपदेचें अवलोकन करतांना, तिचे दोन वेगळे भाग केले पाहिजेत : एक भाग म्हणजे त्याचे अर्थशास्त्र व तर्कशास्त्र यांवरील पांडित्यपूर्ण प्रबंध; आणि दुसरा भाग म्हणजे राजकीय तत्त्वज्ञानावरील त्याचे प्रबंध. माझ्या मतें, त्याचें ' तर्कशास्त्र ' इतकें महत्वाचें नाहीं. पण राजकीय तत्वज्ञानांत मात्र मिलनें जी भर घातली आहे ती मला फारच मोलाची वाटते.

## कार्लाइलचे मध्ययुगीन विचार

मिलच्या काळीं उपयुक्ततावादी तत्त्वज्ञानाला आक्षेप घेणारे पुष्कळ लोक होते. पण या आक्षेप घेणाऱ्या लोकांचा स्वभाव वा पिंडच वेगळा होता. दयाळु वृत्तीबद्दल, सौजन्याबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार वसत होता. दुसऱ्यांना सुखी पहाणें त्यांना रुचत नव्हतें. उपयुक्ततावादी तत्त्वज्ञानावर आक्षेप घेणाऱ्या अशांपैकीं कार्लाइल एक होता. कार्लाइल म्हणत असे : ' तुम्हांला सुख लाधलेंच पाहिजे असा नियम थोडाच आहे ? " कोणी सुखी होणारच नाहीं अशी त्याची धारणा होती. याच भूमिकेवरून उपयुक्ततावाद कार्लाइलला महाभयंकर वाटत असे. — मिल व कार्लाइल या दोघांमध्यें मूलभूत विरोध होता. स्वभाव, राजकीय मतें— प्रत्येक बाबतींतच त्यांचीं दोन विरुद्ध टोंकें होतीं. कार्लाइल फार असहिष्णु होता. मध्ययुगीन कल्पनांपैकीं चांगल्या वगळून वाईट कल्पना तेवढ्या वर्तमान काळीं प्रचारांत जिवंत ठेवाव्या असें त्यास वाटे. द्वेष, हिंसा, दडपशाही या गोष्टींचा तो पुरस्कार करीत असे. इतिहासांत जे अत्याचारी, हिंसक वृत्तीबद्दल प्रसिद्ध आहेत त्यांच्याबद्दल त्याला मनापासून प्रेम वाटे.

एंगल्स देखील स्वतःला कार्लाइलचा शिष्य मानीत असे हें खरें. पण हें शिष्यत्व कार्लाइलच्या ' पास्ट अॅन्ड प्रेझेंट ' या पुस्तकापुरतें होतें. त्या पुस्तकांत कार्लाइलनें भांडवलशाहीवर कडाडून हल्ला चढविला आहे. पण एंगल्सच्या—आणि मला वाटतें, मिलच्याहि—हें लक्षांत आलें नाहीं कीं कार्लाइलचा भांडवलशाहीवर हल्ला हा समाजवादी भूमिकेवरून नव्हता, तर मध्ययुगीन समाजव्यवस्थेच्या प्रेमामुळें होता. सरदार आणि त्यांचे गुलाम ही स्थिति पुन्हां यावी असें कार्लाइलला वाटे. कार्लाइलचें स्तोम भलतेंच माजलें होतें. लोकांना त्यानें भुरळ पाडली होती. माझे आईवडील मात्र या भुरळीला बळी पडले नाहींत. कार्लाइलला आपण एकदां भेटायला गेलों असतांना, कार्लाइल रायफल क्लबांशिवाय प्रत्येक गोष्टीला कशा शिव्या मोजीत असे याचें मजेदार वर्णन माझ्या आईनें आपल्या डायरींत करून ठेवलें आहे. भांडवलशाहीचा कार्लाइल धिक्कार करीत असे, म्हणून हा मोठा क्रान्तिवादी आहे असें लोक समजत. पण लोकांच्या हें लक्षांत आलें नाहीं कीं, त्याच्या या भांडवलशाही-धिक्कारामागें मध्ययुगीन सरंजामशाहीचा पुळका होता.

## मिल आणि स्त्रीस्वातंत्र्य

मिल व त्याचे समकालीन विचारवंत यांची तुलना केली तर असें आढळून येईल कीं, आधुनिक काळींहि ज्याचे विचार सामर्थ्यशाली व उपयुक्त ठरूं शकतील असा जॉन स्टुअर्ट मिलच होय. मिलचा अधिकार त्याच्या काळींहि— विशेषतः त्याच्या उत्तरायुष्यांत मान्य झाला होता. त्याच्याबद्दल लोकांना अपरंपार आदर दिसून येतो. मिलच्या अंगीं जी विलक्षण समजूतदारपणाची व बुद्धिवादाची वृत्ति वसत होती, तिच्यामुळें त्याची सर्वांवर छाप पडत असे.

मिलची एक विशेष कामगिरी म्हणजे स्त्रियांच्या पारतंत्र्याविरुद्ध त्यानें प्रकट केलेले प्रभावी विचार. आज स्त्रियांचें स्वातंत्र्य सर्वमान्य झालेलें असल्यामुळें, मिलच्या ह्या कामगिरीचें विस्मरण होतें. माझ्या तरुणपणीं मिलच्या स्त्रीस्वातंत्र्यविषयक विचारांचा माझ्यावर फार परिणाम झाला. मिलचें या विषयावरील म्हणणें मला सर्वस्वीं पटलें. पण त्या वेळीं, माझ्या विद्यार्थिदशेंत, स्त्रीस्वातंत्र्याला समाजाचा इतका भयंकर विरोध होता कीं आज त्याची कोणी कल्पनाहि करूं शकणार नाहीं. आज मिलच्या स्त्रीविषयक विचारसरणीचा संपूर्ण विजय झालेला आहे. आजहि कांहीं लोक स्त्रीस्वातंत्र्याविरुद्ध नाना युक्तिवाद करतांना आढळून येतात. हे त्यांचे युक्तिवाद आजच्या आधुनिक कालप्रवृत्तीच्या विरुद्ध आहे याची त्यांना जाणीव नसते असें नव्हे. तरीसुद्धां कोडगेपणानें त्यांचें








स्त्रीस्वातन्त्र्यविरोधी दुमणें ते चालूंच ठेवतात. पण माझ्या विद्यार्थिदशेच्या काळीं स्त्रीस्वातंत्र्याविरुद्ध युक्तिवाद इतक्या तळमळीनें व निभ्रांतपणें मांडले जात कीं जणु ते स्वयंसिद्ध असे सिद्धान्तच मानले जात व ते नाकारणारा मनुष्य एक विक्षिप्त वावदूक वितंडवादीच गणला जाई! आज ती परिस्थिति नाहीं. परिस्थितींत झालेल्या या परिवर्तनाचें श्रेय पुष्कळसें जॉन स्टुअर्ट मिललाच आहे.

## समाजवादाकडे कल

मिलच्या विचारावर १८४८ च्या फ्रेंच राज्यक्रान्तीचा परिणाम मोठा मजेदार झाला. १८४८ च्या राज्यक्रान्तीनें मिलचें लक्ष इतकें वेधून घेतलें कीं त्यानंतर फ्रान्समधील होणाऱ्या घटनांकडे व तेथील विचारवंतांकडे तो कौतुकानें पाहूं लागला. समाजवादाकडे पूर्वीपेक्षां अधिक आस्थापूर्वक सहानुभूतीनें बघायला मिलला १८४८ च्या फ्रेंच राज्यक्रान्तीनेंच प्रवृत्त केलें. किंबहुना त्यामुळेंच, स्वातंत्र्यप्रेमी असूनहि तो कांहीं एका मर्यादेपर्यंत समाजवादी विचाराचा झाला. फ्रान्समधील १८४८ च्या राज्यक्रान्तींत ज्या घटना घडून आल्या त्या त्याला खूपच बोधप्रद वाटल्या. तिसऱ्या नेपोलिअनबद्दल त्याला मनस्वी चीड वाटे. फ्रेंच लेखकांच्या विचाराचा परिणाम मिलवर बराच झाला. त्या मानानें जर्मन विचारांचा कांहींहि झाला नाहीं. असें असून जेव्हां फ्रान्स व जर्मनी यांचें युद्ध जुंपलें त्या वेळीं मिलनें जर्मनीची बाजू घेतली! ही गोष्ट आश्चर्यकारक वाटते खरी. पण त्याला कारण मिलला तिसऱ्या नेपोलिअनविषयीं वाटणारा तिरस्कार हेंच होय.

आज जर मिल हयात असते तर त्यांना आपल्या हल्लींच्या राज्यव्यवस्थेंतील समाजवादी गोष्टी मान्य झाल्या असत्या का? – मला तर वाटतें कीं त्यांना त्या मान्य झाल्या असत्या. कांहीं गोष्टी त्यांना आवडल्या नसत्या. पण इतर पर्यायाच्या अभावीं त्यांनीं त्या स्वीकारल्या असत्या. याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्यावर पडलेला मिसेस टेलर यांचा प्रभाव होय. मिसेस टेलर यांचा प्रभाव पडायला त्या स्त्री होत्या हें एक कारण होतेंच. त्याशिवाय, त्यांनीं पित्याची जागा भरून काढली हेंहि कारण होय; पित्याच्या वर्चस्वाला मान तुकवणें हा मिलचा स्वभावच बनून गेला होता. पित्याच्या मृत्यूनंतर ती जागा भरून काढायला कोणी हवेंच होतें. एखाद्याच्या वर्चस्वाविरुद्ध बंड करून उठणाऱ्या बंडखोर माणसांना आपणांवर अधिकार गाजवणाऱ्या माणसाची जागा भरून काढणारा दुसरा कोणी तरी हवाच असतो. मिल यांची तीच स्थिति होती. स्वातंत्र्यावरील त्यांचा विश्वास ही शेवटीं एक ध्येयभूत आकांक्षाच राहिली.

मिलबद्दल विशेष कौतुक वाटत असेल तर तें त्याच्या बुद्धिबलाचें एवढें नव्हे तर त्याच्या सौजन्याचें, त्याच्या प्रांजळ स्वभावाचें व त्याच्या बौद्धिक प्रामाणिकपणाचें. हे त्याचे गुण खरोखरींच मला अलौकिक व विशेषच आदरणीय वाटतात.

## मिलचे 'स्वातंत्र्या'विषयीं विचार

मिलच्या ग्रंथांमध्यें सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे त्याचा 'स्वातंत्र्या' –( Liberty ) वरील ग्रंथ होय. माझ्या लहानपणीं, जगांतील सर्वच ठिकाणीं नसली तरी बहुतेक देशांतून स्वातंत्र्याविषयींची आस्था आजच्यापेक्षां अधिक आढळून येत होती असें मला म्हणावेंसें वाटतें त्या वेळीं आजच्यासारखे सुसंघटित पक्ष नव्हते. राष्ट्रवादांत त्यावेळीं आजच्या इतका भयंकर क्रूरपणा आढळून येत नव्हता. आज जसे कम्युनिस्ट आणि कम्युनिस्टविरोधी — अशीं दोन ध्रुवासारखीं अगदीं परस्परविरुद्ध टोकें आढळून येतात तसें त्या वेळीं नव्हतें. आजच्यापेक्षां त्यावेळीं स्वातंत्र्यभावनेला वातावरण पुष्कळच अनुकूल होतें. आज पहावें तों बहुतेक देशांतील राज्यसत्ता भयभीत झाल्या असून पूर्वी कधीं नव्हत्या इतक्या जुलमी बनल्या आहेत!

शिक्षण हें सक्तीचें असावें परंतु तें सरकारच्या हातीं असूं नये असें मिल यांचें म्हणणें आहे. शिक्षण हें सक्तीचें असावें हें मला मान्य आहे. सरकारशिवाय जर कोणी हें घडवून आणूं शकत असेल तर तें इष्टच होय. पण आज सर्वत्रच शिक्षण हें सरकारच्या हातीं गेलें आहे. आणि बहुतेक सर्वच सरकारें किंवा राज्यसत्ता आपल्या शिक्षणयंत्रद्वारें संकुचित राष्ट्रवादाचें शिक्षण देत असतात. त्यामुळें सामुदायिक कार्याच्या बाबतींत मानवजातीचें सहकार्य मिळणें कठिण होऊन बसलें आहे. ग्रेटब्रिटनमध्येंदेखील जें शिक्षण दिलें जातें त्यामुळें राष्ट्रवादाचा पगडा विद्यार्थ्यांवर पडणें अधिक सुलभ झालें आहे. नेपोलिअनच्या काळांतील युद्धाच्या वेळची लोकांची वृत्ति व अलीकडील काळच्या युद्धाच्या वेळची लोकांची वृत्ति यांची जर तुलना करून बघितली तर

वरील विधानाची साक्ष पटूं शकेल.

मिलचें 'स्वातंत्र्या' विषयींचे विचार आज अत्यंत महत्त्वाचे आहेत. ज्या वेळीं त्यानें ते मांडले त्या वेळच्यापेक्षांहि आज त्यांचें महत्त्व अधिक आहे. जगाला आज त्याच विचारांची गरज आहे. स्त्रीस्वातंत्र्यासारख्या इतर विषयांवरील मिलच्या विचारांची आज एवढी गरज नाहीं. कारण ते प्रश्न आज सुटलेले आहेत. पण स्वातंत्र्याची समस्या मात्र अजून सुटलेली नाहीं. मी तर या बाबतींत अगदीं कट्टर उदारमतवादी आहे. विचारस्वातंत्र्य, विचार प्रकट करावयाचें स्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य या गोष्टींवर माझी अढळ निष्ठा आहे. हीं स्वातंत्र्यें किती आवश्यक व महत्त्वाचीं आहेत याचीं कारणें मिलनें दिलेलीं अगदीं आजहि तंतोतंत लागूं आहेत. हीं स्वातंत्र्यें मिळाल्याशिवाय माणसाचीं मतें परिपक्व बनत नाहींत, नवीन विचारांनाहि वाव व संधि मिळत नाहीं. उलट, असहिष्णुतेची वृत्ति निर्माण होते. या असहिष्णुतेवर रामबाण तोडगा म्हणजे निर्भय, मुक्त चर्चा हाच होय.

---

## भूदानयज्ञांतून दंडमुक्त समाजाकडे —!

दंडमुक्त समाज बनायला कांहीं काळ लागेल, बराच काळ लागेल असें वाटत होतें. पण जेव्हांपासून हें आताहिंसेचें स्वरूप प्रकट झालें तेव्हांपासून माझ्यांत फार मोठा उत्साह संचारला आहे आणि दंडमुक्त समाज आतां लवकर आणतां येईल अशी उमेद वाटूं लागली आहे. या उमेदीचा आशय जर मी तुम्हांला समजावून देऊं शकलों आणि तिचा जर स्पर्श तुमच्या हृदयाला होईल तर आपणां सर्वांचें रूपांतर परिशुद्ध, परिनिष्ठ, आत्ममय मानवतेंत होईल. ही जी माझी उमेद ती खूप वाढली आहे आणि जेव्हां जेव्हां ॲटम बॉंब आणि हायड्रोजन बॉंबच्या गोष्टी चालतात तेव्हां तर मला वाटतें कीं मला एक ईश्वरी प्रेरणा होऊं लागली आहे, आणि सारी सारी समाजरचना आतां माझ्या हातांत येणार आहे, खूप वेगानें ती माझ्याकडे धांवत येत आहे. ती ओरडून म्हणत आहे कीं 'हे अहिंसादेवी, ये आणि याला वांचव.' तेव्हां आतां आमचें काम यापुढं सोपें होणार आहे कीं अवघड याचा आम्ही विचार करण्याजोगी ही गोष्ट आहे. तें काम आपल्याला सोपें होणार आहे. कालचक्र तें सोपें बनवायला लागलें आहे हें लक्षांत आलें पाहिजे आणि त्या दृष्टीनें हिंमत करून आपल्याला पुढची सारी योजना बनविली पाहिजे. शासनमुक्त समाजाची आतां तयारी चालू आहे. दोन वर्षांच्या आंत ५ कोटी एकर जमीन प्राप्त होऊन एका प्रश्नाच्या सोडवणुकीचें दर्शन होईल कीं होणार नाहीं, अशा गोंधळांत आमच्यापैकीं कांहीं लोक पडले आहेत. त्या गोंधळाचा मला तर स्पर्शहि होत नाहीं मला तर वाटतें १९५७ सालांत शासनमुक्त समाजाची स्थापना साऱ्या जगांत कां नाहीं होणार ? ही कांहीं केवळ एक कल्पना नाहीं. जर आपण बरोबर हिंमत बांधली आणि जरा या दृष्टीनें खोलांत जाऊन विचार केला तर मानव कितीहि मूर्ख झाला तरी स्वजातीचाच संपूर्ण नाश करण्याला प्रवृत्त होण्याइतका तो मूर्ख खात्रीनें बनणार नाहीं, हें दिसून येईल.

या भूदान-यज्ञाकडे मर्यादित दृष्टीनं पाहूं नका. तेवढ्या मर्यादित दृष्टीनें जर आपण पाहूं तर गोते खाऊं. पण व्यापक दृष्टीनें पाहूं तर दिसेल कीं एक मोठा खेळ साऱ्या दुनियेंत चालला आहे आणि त्या खेळाचा मध्यबिंदु पुनः भारत बनूं पहात आहे. म्हणूनच ही प्रेरणा आम्हांला मिळालेली आहे. तिकडे पं. नेहरू साऱ्या जगांत शांति स्थापित व्हावी आणि शांतीच्या विचारांना उठाव मिळावा यासाठीं खटपट करीत आहेत. ज्या पद्धतीनें ते काम करीत आहेत त्या पद्धतीची ते पराकाष्ठा करीत आहेत. ती प्रेरणासुद्धां हिंदुस्थानांतूनच बाहेर पडली आहे आणि भूदानयज्ञाची प्रेरणाहि हिंदुस्थानांत प्रकट झाली आहे. स्वातंत्र्याचा जो एक मार्ग निघाला तोसुद्धां हिंदुस्थानांतच निघाला. तेव्हां अशा रीतीनें एकंदरीनें पाहतां असें दिसून येत आहे कीं, जगांत एक प्रेरणा काम करूं लागली आहे आणि त्यासाठीं पुनः एकदां भारताला निमित्त बनायचें आहे. हें आमचें आवाहन साऱ्या जगाला आहे. आपण दोन वर्षे जोर लावूं या आणि १९५७ पर्यंत दंडमुक्त समाज स्थापन करू या.

— आचार्य विनोबा

( जगन्नाथपुरी येथील सर्वोदयसंमेलनापुढें केलेल्या भाषणांतून, २६-३-५५. )








डॉ. सरोजिनी बाबर

# शाहिरी वाङ्मयांतील समाजदर्शन

महाराष्ट्राच्या ऐश्वर्यासंबंधींचा विचार मनामध्यें घोळूं लागला म्हणजे ज्या अनेक वैभवशाली गोष्टी नजरेंत भरतात, त्यापैकीं शाहिरी वाङ्मय ही एक प्रमुख गोष्ट आहे. मराठेशाहीनें ऐश्वर्य या वाङ्मयामध्यें प्रतिबिंबित झालेलें आहे. ओज आणि माधुर्य या गुणांनीं नटलेलें हें वैभवसंपन्न काव्य आहे. त्यामध्यें मराठी भाषेचें नागरपण ओतप्रोत भरून राहिलेलें आहे. मराठ्यांच्या डोळे दिपवणाऱ्या पराक्रमासारखेंच हें शाहिरी वाङ्मयहि नजरेंत भरल्याविना रहात नाहीं.

शायर या मूळच्या अरबी शब्दापासून मराठीमध्यें शाहीर हा शब्द आलेला आहे. शाहीर म्हणजे कवि, काव्यलेखन करणारा मनुष्य. वास्तविक कवि हा कोणत्याहि कालामध्यें जन्माला येतो. परंतु हे शाहीर ज्या कालांत जन्माला आले, तो काल आणि त्यांनीं त्या वेळीं केलेली रचना ही वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यामुळें मराठ्यांच्या वैभवसंपन्न राज्यामध्यें निर्माण झालेले कवि आणि त्यांचें काव्य यांस विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे.

शाहिरी वाङ्मयाच्या पूर्वीचें काव्य संस्कृतप्रचुर आणि पंडिती थाटाचें होतें. जुन्या संस्कृत ग्रंथांवर त्याची रचनाहि आधारलेली होती. त्यामुळें सर्वसामान्य मनाच्या तें आवाक्याबाहेरचें होतें ! परंतु शाहिरांनीं मराठी भाषेला एकदम नव्या युगाचें दर्शन घडविलें. त्यांनीं बहुजनसमाजाच्या साध्याभोळ्या अंतःकरणाला वाचा फोडली. आणि त्यामुळेंच एक प्रकारचें अभिनव वैशिष्ट्य या वाङ्मयास प्राप्त झालें.

ढोलकीं, एकतारी, डौर, संबळ, डफ, तुणतुणें इत्यादि प्रकारच्या विविध देशी वाद्यांची सुंदर आणि डौलदार साथ घेऊन शाहीर आपलें काव्य मोठ्या दिमाखानें गाऊन दाखवूं लागले. आणि त्यांच्या देशी आचारविचारांनीं व कल्पनांनीं जोपासलेल्या मनामधून झालेल्या भावनाविष्काराचें जनतेनेंहि सहर्ष स्वागत केलें. स्वदेशाच्या पराक्रमानें भारलेलें अंतःकरण बोलूं लागलेलें बघून सामान्य मनालाहि एक प्रकारची उभारी आली आणि शाहिरांचें काव्य लोकप्रिय होत गेलें.

शाहिरी वाङ्मयाचे प्रामुख्यानें दोन प्रकार आहेत : एक धडाडीनें पुढें आलेला पराक्रम आणि शौर्य चित्रित करणारा पोवाडा आणि दुसरा म्हणजे तरुण मनांतील शृंगार ज्यांत उतरलेला आहे त्या लावण्या. वीर-रसाविष्कारावांचून पोवाड्याला मजा नाहीं आणि शृंगाराशिवाय लावणीची लज्जत नाहीं असें अगदीं ठरून गेलें. पोवाडे किंवा लावण्या हे वाङ्मयप्रकार राष्ट्राच्या पडत्या काळांत कधींहि जन्माला येत नाहींत ! अंधार बाजूस सारून प्रकाशांत येणाऱ्या राष्ट्राच्या भाग्योदयाच्या काळांतच त्यांना खरा बहर येतो.

एकाच वेळीं सर्व जातींच्या व सर्व पंथांच्या लोकांनीं आनंद लुटावा, वीररसानें न्हाहून निघावें आणि समाधानाची धुंदी सर्वांच्या मनावर चढावी, ही राष्ट्राच्या ऐश्वर्याची खरी निशाणी मानली जाते. शाहिरांनीं याच ऐश्वर्याचें गुणगायन केलें. त्यामुळें त्यांचें काव्य हें त्या विशिष्ट कालाचें जिवंत मोजमाप ठरलें !

' शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दानें ऐकावा ' या ईर्षेनें या काव्याचें स्फुरण झालें आणि त्याच ईर्षेनें त्याची जोपासनाहि झाली. बहुजनसमाजांतील सर्वसामान्य मनानें या काव्याला जन्म दिला, हेंच त्याचें प्रमुख वैशिष्ट्य.

छत्रपति शिवाजीमहाराजांच्या राज्यामध्यें मराठी मनाला खरी स्फूर्ति यावी अशा पराक्रमानें महाराष्ट्राचें मन भारून गेलें. त्याच पराक्रमाची खूण पटविणारा सर्वांत जुना असा पोवाडा अग्निदासानें लिहिला. आजपर्यंत उपलब्ध झालेल्या पोवाडा-वाङ्मयाची हीच जुनी निशाणी आहे. या कवीनें शिवाजीमहाराजांनीं अफझुलखानाची जी इतिहासप्रसिद्ध भेट घेतली तिचें वर्णन या पोवाड्यांत केलें आहे. गेल्या दहावीस वर्षांमागें महाराष्ट्राला शिवाजीबद्दलच्या पोवाड्याचें भारी वेड होतें. लहानलहान मुलें देखील गोविंदकवींचा ' देशाचा पालनवाला । तो शिवाजी राजा











झाला ॥' हा पोवाडा म्हणण्यांत भूषण मानीत. एखाद्या चुणचुणीत मुलानें डफावर थाप मारून 'धन्य धन्य शिवाजीमहाराज' असें म्हणायला आरंभ केला कीं, मराठी मन विलक्षण आत्मीयतेनें त्या काव्यांशीं समरस होण्याची शिकस्त करीत असें ! गेल्या बेचाळीसच्या क्रांतीचें आजच्या शाहिरांनीं केलेलें गुण-गान देखील तेवढेंच लोकप्रिय ठरल्याचें सर्वांना आठवत असेल. सामुदायिक भावनेचा आविष्कार अशा कवनांमधून होत असल्यानें कोणत्याहि काळामध्यें त्यास स्वाभाविकच लोकप्रियता लाभत असते. फक्त काळ बदलेल त्याप्रमाणें विषयाचाहि ओघ पुढें जात असला पाहिजे इतकेंच काय तें.

सामान्यतः असा एक सर्वमान्य सिद्धान्त आहे कीं, देश-काल-परिस्थितीचें प्रतिबिंब त्या त्या वेळच्या वाङ्मयामध्यें प्रतिबिंबित झालेलें असतें. त्या दृष्टीनें या शाहिरी वाङ्मयाचें अंतरंग तपासावयाचें तर प्रामुख्या-नें असें दिसून येतें कीं, हे पोवाडे आणि ह्या लावण्या पुरुषवर्गानें रचलेल्या आहेत. आमच्या स्त्रियांनीं या प्रकारच्या लेखनकार्यास हातभार लावलेला नाहीं ! माझ्या कल्पनेप्रमाणें बाईला अशा प्रकारचें लेखन अशक्य आहे. त्याचें कारण असें कीं, स्त्रियांना घराच्या विशिष्ट जगापलीकडे पराक्रमाला, विशेषतः रणांगणा-वरील पराक्रमाला वाव नसतो आणि दुसरें असें कीं, शृंगारांतील उत्तानता तिच्या मनाला तितकीशी पेलत नाहीं ! एखाददुसरा अपवाद सोडला तर असें दिसून येतें कीं, बाईनें मोठ्या ठेकेदार पद्धतीनें पोवाडा म्हटल्याचें ऐकिवांत येत नाहीं अगर लावणीमधील शृंगार उघड्या डोळ्यांनीं वाचून वा बोलून दाखविण्यांत वेळहि दवडला नाहीं ! लावण्या वाचतांना त्यामधील उत्तान शृंगार सर्वसामान्य सु-संस्कृत स्त्री-मनाला बरा न वाटल्यानें वाचणाऱ्या बाईची नजर भराभर पुढें जाते व खोलांत शिरूं पहात नाहीं, याचा पडताळा मला अनेकदां आलेला आहे ! असें असलें तरी आमच्या शाहिरांनीं आपल्या कवनांतून स्त्रीला मात्र रंगविलें आहे. आणि तेंहि सामान्यतः पुरुषी दृष्टिकोनामधूनच !

समाजाच्या मनाचें मोजमाप सामान्यपणें त्या समाजांतील स्त्रियांना दिल्या जाणाऱ्या सामाजिक दर्जा-वरून मापलें जातें. भारताचे पहिले 'राजदूत' स्वामी विवेकानंद यांनीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ज्या देशांतील स्त्रीला स्वतंत्रपणें जगतां येत नाहीं वा तिला तसा अवसर दिला जात नाहीं तो देश स्वतंत्र आहे असें म्हणतां येणार नाहीं ! या दृष्टीनें आमच्या शाहिरांनीं रंगविलेल्या स्त्रीवर्गाचें दर्शन करून घेणें उद्बोधक होईल.

सुरुवातीस उल्लेख केलेल्या अग्निदासाच्या पोवाड्या-मध्यें राजमाता जिजाऊचें वर्णन आलें आहे. अफझुलखानाच्या भेटीला जावयाचें म्हणजे मृत्यूचें आव्हान स्वीकारावयाचें अशी स्थिति असतांना शिवाजीनें हें धाडस करूं नये अशी तिची इच्छा. पण राजकारण नजरेसमोर ठेवून शिवाजीनें ह्या धाडसाची सिद्धता केली :

" डावें हातीं बिचवा त्याला ।
वाघनख सरज्याच्या पंजाला ॥
वरून बारीक झगा घातला ।
कंबरबस्ता वेढा केला ।
पोलाद घातली गळां ॥ ... "

तरीपण आईचें मन धजेना. ठरलेल्या कार्यापासून परावृत्त होण्याचा मोह होऊं नये म्हणून शिवाजीनें आईची भेट घेण्याचें रहित केलें. पण बिवारी आली. तिनें शिवाजीशीं गोष्ट केली :

" जिजाऊ बोले महाराजाला । 'शिवबा ! बुद्धिनें काम करावें । उशनें संभाजीचें घ्यावें ॥' जिजाऊ घेती अलाबला । 'शिवबा, चढती दौलत येऊं दे तुला । घे यशाचा विडा ।' शिवबा स्मरे महादेवाला । गळां घातिली मिठी । मातेच्या चरणीं लागला । ... "

आणि वात्सल्याचा उमाळा गिळून जिजाऊनें मुलाच्या पराक्रमाला वाव देऊं केला. आशिर्वाद देऊन तिनें त्याला भलें चिंतित पुढें केलें. स्वराज्याची किंमत तिनें अशा प्रकारें जाणली, पारखली. स्वतःच्या भावने-पेक्षां राष्ट्राची थोरवी तिला अधिक मोलाची वाटली. आणि जिजाऊनें शिवबा तयार केला हें सिद्ध कल.

प्रभाकर शाहिरानें आपल्या वेळच्या कुलीन मराठा स्त्रीची कल्पना आपल्या काव्यामध्यें अशी दिली आहे :

"...लांबलचक वेणी, त्रिगुन त्रिवेणी, धरणीगो अवतरलो । बुचड्याचा आधीं झोंक, त्यामध्यें ठेवी कोंकनोक, झोंक भर पुरली । सुकुमार नार, फार गुळे अनार, शाल दुशाल पांघरली । खडी केतक कुहरी,







नोर नक्षीदार लहरी, कवड्याची घडण शहरी, मुद चंद्रकोर गहरी, देती चंद्रसूर्य बहारी, सारी शान केवळ लहरी। उचलुन धरी निरी, तसु तसुवर चिरी, खरीखुरी परी नटली। अशि असोन करि कोकिळ किजविज, आ कसची वीज तुटली। ..."

यावरून त्यावेळच्या कुलीन स्त्रीच्या साजशृंगाराची आणि पेहेरावाची पद्धत कशी होती याची कल्पना येते.

त्यावेळच्या स्त्रिया पुरुषांप्रमाणें घोड्यावरून फेरफटका करीत असत. ह्या गोष्टीची कल्पना परशुरामकवीनें एका कलावंतिणीचें चित्र रंगवून अशी दिली आहे:

'अस्सल जरदी घोडी भिवरथडी वर बसली चांदणी। कान कळाशी फेरफटक्यामधीं कोणीतरी दिली आंदणी। जडित जोहार, ल्याली अंगावर, नवी नवतीचा नवा। वाळे रुमझुम, पायीं छुमछुम बोलती जणुं चिमणीचा चिवचिवा। चोळी अंजिरी कांठाची, रंग कटारी नवा। कवळी कर्दळी पिवळी कांति, मृदु मिन्याचा रवा। चिरी कुंकाची बारिक निढळीं घाम आला डबडवा। नेत्रीं अंजनी, चित्रीं बाहुल्या पाहुनि आवडली जीवा। दोन्हीं बोटीं मुद्रिका दाट हातीं लखलखाट, झळकती चुडे वर नीर पाचुचे खडे। रस्त्यांत उभी जाऊन नटून जशी वीज तुटून कडकडून पडे। फाकली प्रभा चहुंकडे।"

त्या वेळच्या सुंदर स्त्रीचें वर्णन करतांना रामजोशी शाहिरानें आपली काव्यशक्ति अगदीं पणाला लावून म्हटलें आहे:

...' सुंदरा मनामधिं भरलि, जरा नाहि ठरलि,
हवेलिंत शिरलि, मोत्याचा भांग।
सुंदर मूर्ति मदनाची, अमृतवदनाची,
मदनकदनाची, विखारी धार॥
बाहुली, कामसूत्रांत, मदन नत्रांत,
कोकशास्त्रांत निपुण ही फार।
शुकपिक यांनीं धरिली बाज, जाहले बाज
कंठि आवाज, विण्याची तार॥
ही मन्मथरस हवा, काय पाहवा,
बूट वाहवा, सफल संसार॥
कचघनांत सौदामिनी, दिवस यामिनी,
जपावी मनीं, कीं न कळे पार॥
वेणींत मूदराखडी, कोर चोखडी,
माडिवर खडी, विडा रंगदार॥
मणि कुसुम कर्ण शोभवी, मतिस लोभवी,
मला तर भवीं वाटली सार॥"

पण ह्या काळाचें वैशिष्ट्य असें कीं, अशा प्रकारच्या या शृंगाराचा आविष्कार हा बसल्या बैठकीपुरताच असे. सार्वजनिक जीवनांत त्याची वाच्यता नसे.

दसऱ्यासारख्या सणाचा आनंद लुटून घरधनी मुलुखगिरीवर निघाला म्हणजे मनाची होणारी व्याकुळता होनाजीनें एके ठिकाणीं अशी व्यक्त केली आहे:

" गांवा जातो प्राणविसांवा,
राहवा दोन गोष्टी सांगुन।
पसरा पदर मजसाठीं सख्यांनो,
घ्या एवढें त्याला मागुन॥ ध्रु॥
हातिच्या हत्यारा शिवायासाठीं
बेतुन आकारल्या।
तंग, तोबरे, रजामे, जीन,
घर शृंगारल्या।
जामदारखान्यांत खजिना,
द्रव्याच्या पेट्या भरल्या।
दोन सलीते सहित कतरा
त्या उंटाच्या तयारल्या।
घरमंडळीसहवर्तमान
अवघ्या फौजा येकसरल्या।
पहिल्यानेंच कुच करून साजणी,
मुक्कामास जाती दुरल्या॥"

पण अशा विनवणीला दाद देणार कोण? त्या वेळचे शिपाई गडी हाडाचे मर्द मराठे होते! कर्तव्याची कदर त्यांना फार. म्हणून ते अशा वेळीं उत्तर देत:

" आस्त्रीं प्रलयंगता,
तुझी ग बुध नाहीं कामाची।
आलीं धन्याचीं पत्रें आम्हांला,
जलदी जाण्याची॥ ध्रु॥
या लष्करची सुख साजणी नये ग सांगाया।
आहे धन्याची दया आम्हांवर कृपेची छाया॥
उठुन ताजीम देतो ठाव पंगतीचा जेवाया।
पोऱ्या खजमतगार कोतवाल घोडा बसाया॥
स्वारी जपुन चाले। नउशें रंगित भाले। वीटेपटेवाले।
हत्ती बिनीवर चाले। नौबत कडाक्याची। नामजाद
शिपाई पुढें जिलिब गारद्याची॥ ..."( होनाजीबाळ)








आणि स्वारीवर निघून जात. त्यामुळें घरच्या लोकांना अधिक उत्कंठा लागे. नाहीं नाहीं तें मनांत येऊन घरची मालकीण शकुनापशकुनाच्या गोष्टी चिंतीत राही. पण तेवढ्यानेंहि मन शांत झालें नाहींच तर मैत्रिणीजवळ लाजतमुरकत भाषा व्हायची :

" वाम नेत्र आज सखे लवूं लागला ।
उगवला दिवसबाई आज चांगला ।
माडिंच्या ग सज्जावरी काग बोलतो ।
हाच शकुन साक्ष पती मार्गे चालतो । . . . "

एवढ्या जिव्हाळयानें स्वारीवर गेलेल्या शिपाईगड्याची वाहव्वा सर्वत्र होई. शाहिरांचें कवन ऐकून मन प्रसन्न होई. आणि त्यांचेवर बक्षिसांचा पाऊस पडे !

अनंतफंदींनीं एक विनोदी कवन करून ' तिकडचें वर्णन ' असें केलें आहे :

' पति तर माझे शूर दांडगे घागरगडचे हंस जसे।
पाणी वाहतां खरी पडल्या खांदा कावड डुल्लतसे।
चवलापुरती करी मजुरी कंबर बांधुनि हजर जसे।
अक्षरशत्रु 'ओनामासी' हें तव ठाउक स्वप्नीं नसे॥'

त्यामुळें क्षणभर सर्वत्र निराळें वातावरण निर्माण होऊन मनाला विरंगुळा मिळण्याची शक्यता असे.

त्यावेळच्या कांहीं स्त्रिया सैन्याबरोबर मुलुखगिरीवर जात असत. वेळीं – अवेळीं पहाटेच्या समयीं बिनीवाल्याचा नगारा कानीं पडतांच खडबडून जाग आली म्हणजे वीरपत्नी आपल्या पतीला जागें करून म्हणत असे :

" करून मघां जिनबंदी सख्या
पुढें स्वतांच बिनिवाले सरले ।
सरंजामि सरकारि एकांडे
ठळक ठळक मागें उरले ॥
रंव पडली पहा ऊंट तटें
किती सौदागर देशावरले ।
हाका आरोळ्या देति भयंकर
मार्ग चुकून डोंगरिं शिरले।
कठिण घाट आज म्हणुन मुळीं
आधिं फकिर आणिक ढाले फिरले ।
अजुन आपुण निद्रिस्त तशामधि होति
मुकाम फारच दुरले ॥
उठा उठा हलविंतें आतां
पहा पहा पहांट फारच झाली ॥
व्हा जाग्रत प्रियकरा कुणाची
खरी नौबत वाजुन राहिली ॥ "
— ( प्रभाकर )

आणि त्याच्या कर्तव्यतत्परतेमध्यें त्यास असें उत्तेजनहि देत असे. त्याच्या शौर्याची लोकांनीं वाहवा कशी करावी व त्याचें हातून अधिक उत्तम कार्य कसें पार पडावें याची तिला काळजी असे !

पूर्वी जागोजाग घोड्यांच्या मोठमोठ्या पागा असत. खेरीज अनेक प्रकारचीं मोकाट सोडलेलीं शिंगरेंहि कुरणांतून चरतांना दिसत. त्यांचेपैकीं देखणीं व नीटस शिंगरें निवडून त्यांना सजविण्याचें काम व त्यांच्या तोबऱ्याच्या तयारीचें काम बायका पहात असत. परशराम कवीच्या एका कवनामध्यें एक वीरपत्नी आपल्या स्वामीची महती सांगतांना म्हणते :

" मादवान सिंगर पागा चरायास बनल्या, पत्र पाठवुन त्या स्वामीनीं शहरासि आणल्या ॥ त्यांत छाट केल्या, नीट देखण्या ज्यांना मी चुणल्या ॥ आधीं वजवुन सजविल्या हौसेनं मग चोख्या विणल्या ॥ तंग तोबरे जीन खोगरें नांवनिशी गिणल्या ॥ बारगिर पोरगे ठेवितां गोष्टी गुजगुजल्या ॥ . . . "

अशा प्रकारें विविध भूमिकांमधील स्त्रीजीवनाचें दर्शन शाहिरांनीं घडविलें असतां देखील होनाजीबाळनें उत्तम स्त्रीची अपेक्षा करतांना म्हटलें आहे :

" दास्य सासुसासऱ्याचें मग पतिसेवा त्यावरी । मर्जी माफक विनोद, एकांती केवल रंभेपरी । सुरतानंदीं मन रिझवुन पतिचे पाय स्वकरें चुरी । यथानुकूल धर्म वासना, संतोष सदा अंतरीं । ज्या गोष्टी प्रिय स्वामिस त्याच गोष्टी साक्षेपें करीं । भोजनसमयीं पंचप्राण अति पतिचें भोजनीं । याच परीं स्नेह मंडित अशि हे शुभ सूचक कामिनी । पतिसहित निर्दोष वास वैकुंठीं याच साधनीं । देह स्वामीकारणीं झिजावा हेतु हृदयामधीं । होनाजीबाळ म्हणे हेच स्त्रियांचे तीर्थाटनविधी " ।

त्यावेळच्या स्त्रियांनीं लिहिलेलें साहित्य उपलब्ध झालें नसल्यामुळें पुरुषमंडळींनीं त्यांच्या रंगविलेल्या चित्रणावरच आज विसंबून रहाणें भाग आहे. तथापि येथवर विविध भूमिकांमधील स्त्रीजीवनाचें जें दर्शन घडलें, तेवढेंहि त्यावेळच्या समाजाच्या मानसिक








बैठकीचें मूल्यमापन करण्यास उपयोगी पडेल यांत शंका नाहीं.

शाहिरांचें वाङ्मय हें मराठ्यांचें खरें काव्य आहे. या वाङ्मयामध्यें महाराष्ट्राची चालरीत, आवडनिवड, लोकांचे गुणदोष, जनसमूहाचा स्वभाव इत्यादि सर्व कांहीं पहावयास सांपडतें. या वाङ्मयाची निर्मिति अंतःकरणांतल्या आंतल्या कप्प्यांमधून समाधानाच्या बैठकीवर झाली आहे. तें वाङ्मय सहजस्फूर्त आहे. त्यामुळें लोकांच्या अंतःकरणाला तें जाऊन भिडलें. त्यांना तें मनापासून आवडलें. कल्पना, विचार आणि मांडणी ह्या सर्व दृष्टींनीं शुद्ध मराठी वळणांतून या वाङ्मयाचा जन्म झाला. त्यामुळें लोकांनाहि तें आपलें वाटलें. स्वाभाविकच शाहिरांना त्यामुळें मान्यता मिळाली.

त्यावेळच्या शूर मराठा सरदाराचें वर्णन करतांना होनाजी बाळ म्हणतो –

" नाजूक बांधा सडक आकृती ठेंगणी गोजिरी। कंगणीदार पगडी शिरीं। कंठिदार अंगरखा, दुपेटा भरनक्षिदार भरजरी। ललाटीं गंध केशरी। सुवर्णतोडे, सुबक हिऱ्याच्या मुद्या चमकती करीं। खप डौल दिसे अंबरीं। गळयांत कंठी, कानिं चौकडा भिकबाळी गोमटी शोभती ॥

... " जरद्या घोडयावर स्वार शिपाई सरदार तो छेलछबेला। मस्तकीं फुलांचा तुरा, शिपाई शुरा, इष्कीं रंगेला। पौर्णिमेस तारांगणीं जसा गगनीं चंद्र उदेला। हे भगवंताचे लाल, सदा खुशियाल, न्यूनता नाहीं। चल पाहूं कन्हय्या राव राजेंद्र सवाई ॥ "

होनाजीबाळ हा पेशव्यांच्या अन्नाचा ऋणी असलेला शाहीर होता. त्यानें आपल्या अन्नदात्याचें व राजधानीचेंहि वर्णन मोठें सुरेख केलें आहे. पुण्याचें वर्णन करतांना तो सांगतो :

" श्रीमंतांचें तक्त पुणें खुषवक्त नमुना बाई।
चल पाहूं कन्हय्या, राव राजेंद्र सवाई ॥
अपूर्व महालमंदिर, उच्च गोपुर, हवाशिर कैसी।
पुण्यवंत नगरी दिसे द्वारका जैशी ॥ "

लोकांची मनोदेवता ही शाहिरांची खरी देवता होती त्यामुळें शाहीर या देवतेशीं बोलत असत. तिच्यासाठींच काव्य करीत. मनांतील भावना ते तिच्याजवळ उघडी करीत. तिच्या काळजाला जाऊन भिडतां यावें म्हणून ते रोजच्या वापरांतील भाषेचा आपल्या काव्यासाठीं उपयोग करीत. त्यामुळें लोकांना काव्याची भाषा ओळखीची वाटे. आपल्याला हें समजतें आहे असं वाटे.

शाहिरांनीं खड्या आवाजांत डफावर थाप मारून कवन सुरू केलें म्हणजे महाराष्ट्राचे कान तृप्त होऊन जात, मन शांत होई, तल्लीन होऊन जाई. गाणारालाहि धन्यता वाटे. ऐकणारांचें मन वर्णित विषयाशीं एवढें एकजीव होऊन जाई कीं, उदार अंतःकरणानं शाहिरांवर बक्षिसांचा पाऊस पडे! वाङ्मयाची पारख त्यावेळच्या समाजाला होत असे. साहित्याची थोरवी समजत असे. दान देण्याची इच्छा होत असे. या संबंधीं उदाहरण म्हणून अज्ञानदासाच्या कडव्यांत आलेला पुढील मजकूर पहातां येईल :

" ... म्हणून शिवाजी सरज्यानें। इनाम घोडा बक्षिस दिला। शेरभर सोन्याचा। तोडा हातांत घातला ॥ "

तो काळ जसा ऐश्वर्यसंपन्न तसाच त्यावेळच्या शाहिराचा रुबाब देखील डोळयांत भरणारा! राम जोशी हा पोवाडे रचणारांचा तुरा म्हणून ओळखला जात असे. त्याची बुद्धिमत्ता विलक्षण तीव्र होती. तो विद्वान् होता. त्याचा आयुष्यक्रम विलासी होता. छंदफंदहि त्याला अनेक होते. तो घरीं असो वा प्रवासांत असो, कोठेंहि असला तरी 'बया' व 'चिमा' यांची जोडी त्याच्याजवळ सतत असे. शिवाय शागीर्द आणि पोऱ्येहि असत. प्रवासांत असतांना वाटेंत कुठेंहि मुक्कामाला उतरला तरी त्याचा थाट अगदीं राजबिंडा असायचा. बरोबरची झालरीदार राहुटी एकदां उभी केली आणि आपला रेशमी काढण्याचा झोपाळा झाडाला टांगून दिला म्हणजे तो त्यावर मजेनें गात बसत असे! त्याच्याबरोबर त्याच्या मर्जीतल्या माणसांप्रमाणेंच कुत्रीं आणि माकडेंहि असत! तसेंच अनेकप्रकारचीं वाद्यें देखील तो सतत बरोबर ठेवीत असे.

शाहिरांच्या काळाचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे काव्य करणारा आणि तें गाऊन दाखवणारा अशा दोन व्यक्तींचीं नांवें एकत्र येत. उदाहरण घ्यावयाचें तर असें कीं, होनाजी या शाहिरानें काव्य केलें तर तें त्याचा मित्र बाळा म्हणत असे. आणि त्यांचा फड








होनाजीबाळाचा म्हणून ओळखला जाई! होनाजीबाळा हें अशारीतीनें लोकांनीं मान्य केलेलें नांव खुद्द होनाजीनेंहि तसेंच चालू ठेवलें व तो आपल्या काव्याच्या शेवटीं तसा उल्लेख करूं लागला.

मराठ्यांच्या काळांत काव्य जसें विलक्षण आनंदानें फुललें तशीच त्यांना हरघडी लागणाऱ्या घोड्यांची निगा देखील उत्तम रीतीनें राखली गेली. मराठ्यांना आपल्या घोड्यांबद्दल भारी प्रेम असायचें. दहा रुपयांपासून तों हजार रुपयांपर्यंत ऐपतीप्रमाणें घोड्यांची खरेदी होत असे! स्वतःची परिस्थिति चांगली असेल तर घोड्याच्या अंगावर सोन्याच्या पुतळ्या, वाळे असे दागिने लोक घालीत. आणि लगाम, अनीन, जीन, जेरबंद वगैरेचा थाटहि डोळयांना दिपविणारा असे! ऐपत नसेल तो माणूस मनाची हौस भागवावी म्हणून आयाळाच्या केसांच्या वेण्या करून व कपाळावर रंगीबेरंगी बटींची गोंडवेणी लोंबत ठेवून शोभा करीत असे! घोड्याचा मालक स्वतः जातीनें त्याची शुश्रूषा करीत असे. स्वतंत्र नोकर ठेवून वैरणपाण्याची काळजी घेत असे. आणि दररोज घोड्याच्या सर्वांगाला 'मसाज' केलें जाईल हें बिनचूक पहात असे. त्यामुळें मराठ्यांचे घोडे मोठे तेजस्वी दिसत. एवढेंच नव्हे तर परक्या देशांतील लोकांनीं देखील "घोडा बाळगावा तर तो मराठ्यांनींच" अशी म्हण व्यवहारी जगांत रूढ करून ठेवली आहे.!

त्यावेळच्या शाहिरांनीं पराक्रमानें भारलेल्या वीररसाबरोबरच भक्तिरसाचाहि अवलंब केला आहे. सगनभाऊनें विठ्ठलाची भक्ति करतांना सांगितलें आहे :

"कटीवर कर ठेवुनि उभा। पंढरपुर भीमातीरीं; स्मरारे राधीच्या वल्लभा ॥ भक्तराज ज्ञानेश्वर तुकाराम सावतामाळी, चोखामेळा वाट पाही दुर्लभा ॥ माय माऊली विठ्ठल अमुचा त्रैलोक्याचा सुभा ॥ अगाध महिमा निष्कलंक जगद्गुरू। सगनभाऊ म्हणे असो द्यावी पूर्ण कृपेची प्रभा ॥"

होनाजीची भूपाळी त्यावेळच्या मराठी मनानें खुशीनें अंतःकरणावर झेलली. आज देखील ती एक अमरकाव्य होऊन बसली आहे. काव्यगुणाच्या दृष्टीनें देखील शाहिरांचें वाङ्मय किती श्रेष्ठ दर्जाचें होतें त्याचा तो एक उत्तम दाखला देतां येईल.

"घनश्याम सुंदरा श्रीधरा। अरुणोदय झाला।
उठि लौकर वनमाळी। उदयाचळीं मित्र आला॥"

ह्या होनाजीच्या भूपाळीनें महाराष्ट्राला अक्षरशः वेडें केलें आहे!

शाहिरांनीं आपलें काव्य लोकरंजनाच्या दृष्टीनें निर्माण केलें. त्यांना त्यांतून कमाईची अपेक्षा नव्हती. तमाशा करीत गांवोगांव ही मंडळी फिरत असत. तरीपण त्यांनीं स्वतःचा नेहमींचा उद्योगधंदा सोडला नाहीं. परशराम शाहिराला तमाशा करीत गांवोगांव भटकून लावणी म्हणणें यांत कमीपणा वाटत असे! आवडीनें त्यानें जरी हा व्यवसाय केला तरी त्यानें मूळचा स्वतःचा शिंप्याचा धंदा सोडला नाहीं. "माझ्या सुई-दोऱ्याला हयात असो" असें तो म्हणे आणि हीच त्याची अपेक्षाहि असे. त्याची वृत्ति सात्त्विक होती.

---

## हळवा संचार!

पाऊल वाजतें मनांत माझ्या
वाळक्या पानाच्या शिरा मोडून
दबलेली धूळ उठे उसळून
धरून बसतो कडा-कंगोरा
एखादा अज्ञात बारकासा भाव–

सायंकाळची गार झुळूक
थबकत जाते निळया आभाळांत
झुलत्या वेलींच्या मांडवाखालीं
डोळयांत भिडते घायाळ नजर!
हिरव्या चुड्यांची मृदु किणकिण
वारा सावरते शिडामधला
जीभ पाझरते चिंचाचें पाणी
मस्त चघळते गौरकांति खोल–
ओठांची लाली सहज हलते
रातराणीचा सुगंध ओला
सुकली माती उरांत फुलते
भिजवित मधु कोरडे निश्वास

...ही नाजूक धूळ, माझ्या मनांत
जपून ठेव तुझ्या गाभाऱ्यांत
फुंकर घालीत जखमी कळांना
उबवून घे हळवा संचार.

— बा. आ. शिनकर








एक चर्चा

# भारतीय भाषा आणि इंग्रजीचें स्थान

[ ' भारतीय भाषा व त्यांचें भारतांतील स्थान ' या पुढील लेखांत डॉ. इरावती कर्वे यांनीं भारतीय भाषाविषयक प्रश्नाचें तुलनात्मक विवेचन केलेलं असून भारतीय संघराज्याची भाषा हिंदीऐवजीं इंग्रजी असावी अशी सूचना त्यांनीं मांडली आहे. आपल्या भारतीय राज्यघटनेनुसार संघराज्याची भाषा हिंदी ही निश्चित झाली आहे ही गोष्ट लक्षांत घेतां डॉ. इरावती कर्वे यांनीं आपल्या लेखांत केलेली सूचना विवाद्यच समजली जाईल. म्हणून डॉ. इरावती कर्वे यांनीं आपल्या लेखांत उद्भूत केलेले मुद्दे व मांडलेल्या सूचना यांबद्दल साधक-बाधक चर्चा व्हावी या हेतूनें प्रस्तुत भाषाविषयक प्रश्नांचा ज्यांनीं विचार केला आहे अशा कांहीं थोर विचारवंतांस या प्रश्नांसंबंधीं लिहिवयास विनंति केली. त्यांपैकीं म. म. द. वा. पोतदार, डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांनीं लिहून पाठविलेलीं मतें डॉ. इरावती कर्वे यांच्या लेखानंतर दिलीं आहेत. डॉ. सी. पी. रामस्वामी अय्यर यांना सध्यां सवड नसल्यामुळें या प्रश्नाविषयीं आपलें मत ते मागाहून कळविणार आहेत. — ही चर्चा वाचकांस उद्बोधक वाटून, भारतीय भाषाविषयक प्रश्नाचा स्वच्छ दृष्टीनें विचार करण्यास तिचा उपयोग होईल यांत शंका नाहीं. — का. सं. ]

## १ भारतीय भाषा आणि त्यांचें भारतांतील स्थान

डॉ. इरावती कर्वे

भारत हा एक मोठा खंडप्राय देश आहे त्यांत निरनिराळे मानववंश राहातात. येथें निरनिराळ्या धर्मांचे, चालीरीतींचे व भाषांचे लोक आहेत. ह्या सर्वांचें मिळून एक राष्ट्र बनविण्याचा आपला प्रयत्न चालला आहे. बहुविधत्व किंवा विविधता हा भारतीय संस्कृतीचा एक विशेष आहे. ह्याबद्दल विस्तारानें कधींतरी विवेचन करतां येईल. पण सध्यां आपल्यापुढील मुख्य प्रश्न असा आहे कीं सांस्कृतिक विविधता राष्ट्रीय ऐक्याला मारक होईल का ? ही विविधता कांहीं अंशीं कायम ठेवून एकराष्ट्रीयत्वाची भावना रुजवतां येईल का ? कीं ही विविधता नाहींशी करून एकजिनसी संस्कृति व एक राष्ट्र असेंच समीकरण बरें ? – ह्या व्यापक प्रश्नांच्या अनुषंगानें भाषेचा प्रश्न ह्या लेखांत चर्चिला आहे.

सांस्कृतिक विविधता ही एका दृष्टीनें व्यक्तिस्वातंत्र्य व परस्परसहिष्णुता ह्यांची निदर्शक आहे. समाजजीवन संपूर्ण व्हावयास ह्या दोन्ही गुणांची आवश्यकता आहे. पण अमर्याद व्यक्तिस्वातंत्र्य समाजविघातकहि ठरतें. त्याचप्रमाणें सांस्कृतिक विविधतेच्या पोटांत फुटीर वृत्तीचेंहि बीज असूं शकतें. म्हणून फुटीर वृत्तीला तर पायबंद असावा पण शक्य तितकी विविधता जीवनांत असूं द्यावी असें वाटतें. निःश्रेयसाचे मार्ग अनेक आहेत. त्यांपकीं एकानेंच फक्त स्वर्गांत जातां येतें व इतर सर्व मार्ग थेट नरकाला नेणारे आहेत असें आपण भारतीय कधींच कबूल करणार नाहीं समाजजीवन जगण्याचे व समाजकल्याण साधण्याचे मार्गहि निरनिराळे असणार व त्या मार्गावरचे पांथस्थ एकमेकांच्या आड न येतां-नव्हे एकमेकांना मदत करून– समाजाचें हित साधूं शकतील. भारतीय समाज व भारतीय संस्कृति ह्याबद्दल वर दर्शविलेल्या भूमिकेवरून हा लेख लिहिलेला आहे.

भारतांत भाषाविषयक प्रश्न घटनेंत एका दृष्टीनें सोडवलेला आहे. त्याचा आतां ऊहापोह कां असा विचार कोणाच्या मनांत येईल. पण प्रगतिशील राष्ट्रांत –त्यांतूनहि नवीन राष्ट्रांत–कोणच्याहि प्रश्नांवर परत नव्यानें विचार होऊं नये असें थोडेंच आहे ! सर्वां-

ह्या लेखांत व्यक्त केलेलीं मतें लेखिकेचीं वैयक्तिक मतें आहेत. डेक्कन कॉलेजचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं.








च्या जिव्हाळ्याच्या प्रश्नावर जितका तात्त्विक विचार होईल तितकें उत्तमच.

भारत हें एक संघराज्य आहे. जीं अनेक लहानलहान राज्यें मिळून हा संघ झाला आहे त्यांत निरनिराळ्या भाषा बोलतात व लिहितात म्हणून भाषाविषयक प्रश्नाचा विचार मुख्य तीन बाजूंनीं झाला पाहिजेः

**( १ ) प्रत्येक घटक राज्यांत बोलभाषा, बोधभाषा व राज्ययंत्र हांकण्याची भाषा कोणती असावी ?**

**( २ ) घटक राज्यांचा जेथें परस्परसंबंध येईल तेथें संघराज्याच्या विधिमंडळांत, संघराज्याच्या केन्द्रीय कचेरींत, केन्द्रीय नोकरीच्या परीक्षांसाठीं वगैरे, म्हणजेच संघराज्याची अशी कोणती भाषा असावी ?**

**( ३ ) भारतीय संघराज्याच्या बाहेर जगांतील इतर राष्ट्रांशीं दळणवळण ठेवण्यास कोणती भाषा असावी ?**

## इतर बहुभाषिक राज्यें

भारतीय संघराज्य हेंच कांहीं एकमेव बहुभाषिक राज्य जगांत नाहीं. इतरहि बहुभाषिक राज्यें आहेत. तीं भारतापेक्षां जुनीं आहेत. त्यांनाहि हा प्रश्न पडला असणारच. त्यांचीं उदाहरणें आपल्याला उपयोगी पडणार नाहींत का ?

भारताची सांस्कृतिक व राजकीय परिस्थिति इतर बहुभाषिक राज्यांपेक्षां बरीच निराळी आहे आणि इतरांचें उदाहरण भारतीय समस्या सोडवण्यास उपयोगी पडणार नाहीं. कसें तें खालील विवेचनावरून स्पष्ट होईल :

**उत्तर अमेरिकेच्या संघराज्यांत** जगांतील जवळजवळ सर्व महत्त्वाच्या भाषा बोलणारे लोक येऊन वसाहत करून राहिले आहेत. तरीहि **संयुक्तसंस्थानें** हें एकभाषिक राष्ट्र आहे. असें होण्यास बरीचशीं ऐतिहासिक व सांस्कृतिक कारणें आहेत. **संयुक्तसंस्थानांत** पहिल्यापासून बहुसंख्य इंग्रजी भाषिक लोक वसाहत करण्यास गेले. फ्रेंच वसाहती ह्या इंग्रज वसाहतवाल्यांनीं नेपोलियनकडून विकत घेतल्या व इंग्रजीभाषिक वसाहतवाल्यांनीं इंग्लंडपासून स्वतंत्र होऊन आपलें निराळें राज्य स्थापलें. जे कांहीं थोडे डच, स्पॅनिश व फ्रेंच लोक होते त्यांना संख्याधिक्यामुळें व राजकीय सत्तेमुळें लवकरच इंग्रजी भाषिकांच्या वर्चस्वाखालीं यावें लागलें. एकदां राज्य स्थापन झाल्यावर गेल्या ५०-७५ वर्षांत इंग्रजी भाषिकांव्यतिरिक्त जे इतर लोक लाखोंच्या संख्येनें **संयुक्तसंस्थानांत** आले त्यांना नागरिकत्व मिळावयाच्या आधीं इंग्रजी शिकावेंच लागे. हे सर्व लोक आपल्या देशांतील अन्नटंचाई किंवा राजकीय जुलूम ह्याला कंटाळून आसऱ्यासाठीं आले होते. ह्या सर्व लोकांनीं भरपूर अन्नवस्त्र व स्वातंत्र्य ह्या तीन गोष्टींसाठीं आपल्या भाषेची किंमत आनंदानें दिली. तरीहि आज निरनिराळ्या भाषिकांचे गट, शाळा व वर्तमानपत्रें संयुक्तसंस्थानांत आहेत. मध्यवर्ती सरकार हें चालू देतें कारण ह्या भाषांना राजकीय जीवनांत काडीचेंहि स्थान नाहीं.

**स्विट्झर्लंडमध्यें** तीन भाषा आहेत व त्या तीनहि भाषांना राज्यांत समान स्थान देऊन स्विट्झरलंडनें हा प्रश्न सोडवला. ह्या तीन भाषांमध्यें रोमॅन्स ह्या चवथ्या भाषेचीहि नुकतीच भर पडली आहे. सगळ्या भाषांना समान स्थान देणें ह्या चिमुकल्या देशाला शक्य झालें. कारण तेथें चारच भाषा आहेत. भारतासारख्या चौदा नाहींत. दुसरें म्हणजे इटालिअन, फ्रेंच व रोमॅन्स ह्या जवळच्या भाषा आहेत व जर्मन इतकी जवळची नसली तरी भाषाशास्त्रदृष्ट्या फार लांबची भाषा नाहीं. ह्या चौभाषिकांना एकमेकांच्या भाषा चटकन् शिकण्यासारख्या आहेत. तरीहि एवढ्याशा चिमुकल्या व मोठमोठ्या भांडकुदळ राष्ट्रांच्या मध्यावर असलेल्या ह्या राष्ट्रांत चार भाषा शेजारी नांदूं शकतात. प्रत्येकाला आपापल्या भाषेंत सर्व शिक्षण घेतां येतें, इतर भाषिकांचीं गांवें व शहरें आपल्यांत ओढून घेण्याविषयीं स्पर्धा नाहीं व भाषा विविध असूनहि दोन महायुद्धांच्या प्रखर कसोटीला ह्या देशाचें एकराष्ट्रीयत्व उतरलें आहे. ह्या गोष्टी आपल्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत.

**सोव्हिएत रशिया** मात्र एक प्रचंड बहुभाषिक राष्ट्र आहे. रशियन भाषा ही केन्द्रराज्याची वा संघराज्याची भाषा आहे व घटक राज्यांत बोलणें, शिक्षण व राज्यव्यवहार त्या त्या राज्याच्या भाषेंतून चालतो.

रशियाची व भारताची परिस्थिति वरवर दिसायला सारखी दिसते व भाषाविषयक प्रश्नहि भारतानें थोडासा रशियाच्या धर्तीवरच सोडवल्यासारखा दिसतो. पण खरोखर पहातां सांस्कृतिक व ऐतिहासिक दृष्टीनें

रशिया व भारत ह्यामध्यें फार मोठा फरक आहे व म्हणून रशियाचें उदाहरण उपयोगी पडण्यासारखें नाहीं.

रशियामध्यें कित्येक शतकें रशियन भाषा बोलणारे लोक राज्यकर्ते होते. रशियांत अस्तित्वांत असलेलें शास्त्र, वाङ्मय, संस्कृति व सर्व तऱ्हेचें शिक्षण हीं रशियन भाषेंतच केंद्रित झालेलीं होतीं. त्याचप्रमाणें ज्या राजकीय तत्त्वज्ञानाचें पुढारीपण आजच्या जगांत रशियाकडे आहे, त्या तत्त्वज्ञानांतील बरेंचसें वाङ्मय रशियन भाषेंतच आहे. कार्ल मार्क्स व एंगेल्स हे दोघे जर्मन भाषिक जरी त्या तत्त्वप्रणालीचे जनक असले तरी त्या तत्त्वांचे प्रमुख भाष्यकार व प्रचारक लेनिन, बुखारिन, स्टालिन वगैरे सर्व रशियनच होते. म्हणून आजच्या रशियन संघराज्याची राजकीय, सांस्कृतिक व ऐतिहासिक भाषा रशियन हीच ठरते. रशियांतील घटक राज्यांपैकीं कोठच्याहि भाषेचा इतिहास वा वाङ्मय रशियन भाषेच्या तोडीचें नसल्यामुळें ती भाषा संघराज्याची भाषा व्हावी हें नैसर्गिकच होतें. असें असूनहि सध्यांच्या रशियन राज्यकर्त्यांनीं घटक राज्यांतील ज्यांना लिपीदेखील नाहीं अशा भाषा जिवंत ठेवून सर्व शिक्षण त्या त्या भाषेंतून देण्याची व्यवस्था केली आहे ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

## भारताची वेगळीच परिस्थिति

ह्याउलट, भारतांत सर्व उत्तरेकडच्या भाषा सांस्कृतिक दृष्ट्या एकाच पायरीवर आहेत. सुमारें १००० वर्षांपूर्वी प्राकृत भाषांपासून त्यांचा जन्म झाला व प्रत्येकीनें आपापलें वाङ्मय निर्माण केलें. मला असें वाटतें कीं बंगाली, मराठी व गुजराथी ह्या भाषांचें वाङ्मय उत्तरेकडच्या सिंधी, पंजाबी, राजस्तानी, हिंदी आणि उडिया ह्या भाषांच्या वाङ्मयापेक्षां अधिक संपन्न व प्रगल्भ आहे. हिंदी-भाषिकांची संख्या जरी इतर कुठचीहि एक भाषा बोलणाऱ्या लोकांपेक्षां अधिक असली तरी हिंदी भाषेंतील वाङ्मय इतर भाषांच्या मानानें गुणानें व परिमाणानें जरा मागसच वाटतें. उत्तरप्रदेशांत मुसलमानी सत्ता १३ व्या शतकापासूनच प्रस्थापित झाली व त्यानंतर सुशिक्षित वर्गानें प्रथम पर्शियन व १९ व्या शतकांत उर्दू ह्या दोन परकीय भाषा आत्मसात् केल्या. बहुजनसमाजानें हिंदी भाषा जिवंत ठेवली.

दक्षिण भारतांत द्राविड भाषांचें वाङ्मयीन कार्य अतिशय भरीव, डोळे दिपविणारें आणि जुनें आहे. तामीळ वाङ्मय सर्व आधुनिक भारतीय भाषांमध्यें सर्वांत जुनें तर आहेच पण आधुनिक युरोपीय भाषांच्या वाङ्मयापेक्षांहि जुनें आहे. उत्तरेकडील भारतीय भाषा अस्तित्वांत येण्याच्या आधींपासून तामीळ, तेलुगू व कन्नड ह्या भाषा अस्तित्वांत होत्या व त्यांची वाङ्मयीन परंपरा मोठी जोमदार असून दक्षिणेकडे उगम पावलेल्या तत्त्वज्ञानविषयक व धार्मिक विचारप्रवाहांची सर्व भारतावर छाप पडलेली आहे. ही परिस्थिति लक्षांत घेतली म्हणजे रशियन व हिंदी ह्यांच्या स्थानांतील मूलभूत फरक ध्यानांत येईल. भारतीय भाषा एकाच पायरीवर आहेत एवढेंच नव्हे तर त्यांतील कांहीं हिंदीपेक्षां वरचढ असतांना हिंदीला जें नवीन महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे त्याबद्दल इतर भाषिकांना थोडेसें वैषम्य वाटल्यास नवल नाहीं.

रशियामध्यें रशियन भाषा ही संघराज्याची भाषा असल्यामुळें संघराज्यांत रशियन भाषिकच मोठमोठ्या जागांवर सर्वत्र दिसून येतात. ह्याबद्दल इतर भाषिकांना फारसें वैषम्य वाटत नाहीं. कारण बाकीच्या बहुतेक भाषांतून लिहिलेलें वाङ्मय जवळजवळ नाहीं. रशियन भाषिकांची संख्याहि इतर सर्व भाषिकांइतकी किंवा कदाचित् जास्तहि असेल. बाहेरील जगाशीं संबंध ठेवायलाहि ह्याच भाषेचा उपयोग रशियन लोक सर्रास करीत असत व हल्लींहि करतात. रशियन भाषेचें स्थान तिला वाङ्मयीन मोठेपणानें व सांस्कृतिक हक्कानेंच प्राप्त झालें आहे.

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

भारतांत हिंदी भाषेला असें स्थान मुळींच नाहीं. वर वर्णन केलेल्या कोणत्याहि राज्यासारखी भारताची परिस्थिति नाहीं. गेल्या ९०० वर्षांतील कांहीं घडामोडींचा थोडक्यांत उल्लेख केल्यास भारतीय भाषांबद्दलचा प्रश्न स्पष्ट होण्यास आणखी मदत होईल.

इसवी सन ९०० ते १००० च्या सुमारास अर्वाचीन उत्तरभारतीय संस्कृतोद्भव भाषा प्राकृतांतून वेगळ्या फुटल्या व त्यांचा जन्म झाला हें वर सांगितलेंच आहे. तरीसुद्धां संस्कृत ही विद्वानांची भाषा राहिली व साहित्य, संगीत, ज्योतिष व तत्त्वज्ञान ह्यांवर उत्तम लिखाण संस्कृत मध्यें होतच होतें. अर्वाचीन भाषा हळूं हळूं बाळपण








संपन्न प्रौढ होत होत्या. कांहीं तीनशें वर्षांतच प्रौढ दशेला पोचल्या हें महानुभावांच्या वाङ्मयावरून व ज्ञानेश्वरी व अमृतानुभवासारख्या ग्रंथांवरून दिसून येतेंच. ह्या भाषांची लौकरच सर्वांगीण प्रगतीहि कदाचित् झाली असती, पण ह्या भाषांच्या जन्ममुहूर्तावरच जवळजवळ एका धर्मवेड्या परकीय सत्तेनें भारतांत प्रवेश केला. सन नऊशें-दहाशेंच्या सुमाराचीं आक्रमणें सोडलीं तरी ११०० च्या सुमारास तुर्की लोकांनीं हिंदुस्थानांत प्रवेश करून बरोबर मुसलमानी धर्म व पर्शियन भाषा व संस्कृति आणली. पहिल्यापहिल्यानें लूट घेऊन निघून जाणारे हे लोक लौकरच जेते म्हणून स्थाईक झाले व आपला धर्मप्रसार त्यांनीं जोरांत सुरू केला. त्यांच्या दरबारीं पर्शियन भाषा चाले व उत्तरप्रदेशांतील लोकांनीं ती भाषा आत्मसात् केली व हिंदी मागें पडली. दक्षिणेकडे ह्या आक्रमणाला तोंड देण्यांत इतकें सामर्थ्य खर्च झालें कीं त्यामुळें देशी भाषांची जरी गळचेपी झाली नाहीं तरी सर्वांगीण वाढ झाली नाहीं.

हिंदुस्थानांतील कांहीं प्रांत मुसलमानी अंमलाखालीं ७०० वर्षें होते, तर कांहीं २०० पेक्षां जास्त नव्हते. इंग्रज येण्याच्या अगोदर कांहीं प्रांतांनीं मुसलमानी अंमल झुगारून दिला होता व त्या त्या प्रान्तांत देशी भाषा वाङ्मयीन दृष्ट्या परत डोकें वर काढूं लागल्या होत्या. पण सर्वांगीण वृद्धि व्हावयास जी राजकीय सत्ता व स्वास्थ्य लागतें तें आजपर्यंत ह्या भाषांना मिळालें नाहीं.

इसवी सनाच्या १६ व्या शतकांत दक्षिणेकडील मुसलमानी राजांच्या दरबारांत उर्दू भाषेंतून वाङ्मयनिर्मिति होऊं लागली. उर्दू ही मूळ दिल्लीच्या आसपासच्या लोकांची बोलभाषा म्हणजे हिंदी भाषेच्या उपप्रकारांपैकीं एक होती. कांहीं लोक तिच्यांत पार्शियन व अरबी शब्दांची खैरात करून वापरूं लागले तर कांहीं शुद्ध देशी शब्द वापरीत. पर्शियन व अरबी शब्दांचा भरणा खूप झाल्यानें त्या भाषेची लिपीहि अरबी बनली व मुसलमानी राजवटींत दरबारी भाषा पर्शियन व शिपायांची भाषा उर्दू असें झालें व बहुतेक मुसलमानांनीं ती उचलली. तरी प्रत्येक प्रांतांतील खेडेगावांतील मुसलमानांना उर्दूहि येत नसे व पर्शियनहि येत नसे. ते त्या त्या प्रांतांतीलच भाषा बोलत. उर्दू ही कोणत्याहि प्रांताची भाषा नव्हतो. पण कांहीं सामाजिक थरांतून सर्व हिंदुस्थानभर तिचा प्रसार झाला. पुढें इंग्रजांनीं हीच भाषा आपल्या लष्करांत शिकवल्यामुळ इंग्रजी राजवटींत तिच्या प्रसाराला अधिकच वाव मिळाला.

## इग्रजीचे दूरगामी परिणाम

इंग्रज १५ व्या शतकापासून हिंदुस्थानांत आले. त्यांचें एकछत्री राज्य भारतांत दोनशें वर्षेंच टिकलें. हें राज्य जरी २०० वर्षेंच टिकलें, तरी त्याचे भारतावर झालेले परिणाम फारच दूरगामी स्वरूपाचे आहेत. इंग्रजांच्या आधीं सबंध भारतावर एकछत्री राज्य कुठच्याहि काळांत नव्हतें. एक शासनव्यवस्था कुठच्याहि काळांत नव्हती.

इंग्रजांच्या राज्यांतहि नव्या धर्माचा प्रचार व प्रसार खूप झाला पण भारतावर मुख्य परिणाम नव्या धर्माचा न होतां, नव्या यंत्रयुगीन उत्पादनाचा, समाजव्यवस्थेबाबतच्या व राज्ययंत्राबाबतच्या तत्त्वप्रणालीचा झाला. प्रजासत्ताक राज्य, प्रत्येक स्त्रीपुरुषाला मतदानाचा हक्क, जातिविरहित समाजव्यवस्था, सर्वाना एक कायदा ह्या भारताच्या घटनेंतील मूलभूत गोष्टी इंग्रजांच्यामुळें आपल्यांत आल्या आहेत व त्या गोष्टींचा अभिमान जागृत होण्यास मुख्यत्वें इंग्लिश वाङ्मयच कारणीभूत झालें.

इग्रजी राज्यकर्ते बरोबर इंग्लिश भाषा घेऊन आले व मेकॉलेच्या तत्त्वांमुळें ती भाषा भारतीय शिक्षणपद्धतींत शिरली. इंग्रजी वाङ्मय जगांतील पुढारलेल्या व संपन्न वाङ्मयापैकीं आहे. त्यांतील धार्मिक मतप्रणालीमुळें नव्हे तर सामाजिक व राजकीय प्रतिपादनामुळें त्या वाङ्मयानें भारतीयांना जीवनाचें एक नवीनच दालन खुलें झाल्यासारखें वाटलें असल्यास नवल नाहीं. सर्व हिंदुस्थानांत सब प्रांतांतून राजभाषा म्हणून पोटासाठीं, व संपन्न वाङ्मयाच्या लालचीनें कित्येक लोक ही भाषा आवडीनें शिकले. ह्याच लोकांनीं समाजसुधारणेचा व स्वातंत्र्याच्या लढ्याचा झेंडा उभारला. स्वतंत्र भारताची घटना मूळ ह्या भाषेंतच घडली व नंतर तिला देशी स्वरूप दिलें गेलें. ह्याच भाषेच्या द्वारें पाश्चात्त्यांच्या ज्ञानाचें भांडार भारतीयांना खुलें झालें.

इंग्रजी भाषा बोलतां येणारे बहुतेक भारतीय जन्मानें आपली स्वतःची अशी भारतीय भाषा बोलणारे होते व आहेत. पण कांहीं अल्पसंख्याक, विशेषतः मिश्र










इंग्रज रक्ताचे लोक आपण राज्यकर्त्यांच्या रक्ताचे व त्यांना जवळचे ह्या भावनेनें कीं काय भारतीय भाषांचा त्याग करून इंग्रजीच आपली मातृभाषा म्हणून मानूं लागले. अशांना इंग्रज राजवटींत लाभहि चांगला झाला व कित्येक दृष्टींनीं हे लोक भारतीय संस्कृति व समाजजावन ह्यांपासून अलिप्त राहिले. ह्यांची जन्म-भूमि व कर्मभूमि भारतच असल्यामुळें इंग्रजांचें कितीहि अनुकरण ह्यांनीं केलें तरी त्यांना इंग्रजी संस्कृति कधींहि आत्मसात् करतां आली नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व प्रान्तांत हे लोक विखुरलेले आहेत.

इंग्रजी राज्यांत सर्व प्रान्तांतील लोकांना नोकऱ्या लागत व सर्व नोकरांच्या सर्व देशभर बदल्या होत. अशा लोकांना इंग्रजी भाषेमुळें परस्पर दळणवळण करतां येई व इंग्रजी शिक्षणामुळें नोकरींतहि लाभ मिळे. ह्यामुळें सरकारी नोकरांत, विशेषतः वरच्या पगाराच्या सरकारी नोकरांच्या कुटुंबांतूनहि मुलांना लहानपणा-पासून इंग्रजी शिक्षण देण्याचा प्रघात वाढला व हीं कुटुंबेंहि भारतीय भाषांना तुच्छ लेखूं लागलीं. ह्याचा असा परिणाम झाला कीं भारतीय वंशाचे असूनहि ह्यापैकीं कित्येक लोक इंग्रजी आपली जन्मभाषा म्हणून सांगूं लागले

बहुतेक शाळांतील वरच्या वर्गांतून व विद्या-पीठांतून इंग्रजी बोधभाषा असल्यामुळें सर्वच उच्च शिक्षण बहुजनसमाजाला कठीण होऊन बसलें. अशा परिस्थितींत स्वातंत्र्य मिळून भारताचें स्वतंत्र प्रजासत्ताक संयुक्त राज्य प्रस्थापित झालें. प्रजासत्ताक राज्याची भाषा काय असावी, हा प्रश्न उपस्थित होऊन ती हिंदी असावी असें घटनेंत ठरलें. पण अजूनहि लोकमत सर्वस्वी त्या बाजूनें नाहीं व विशेष विरोध दाक्षिणात्यांचा आहे. हा विरोध केवळ भांडकुदळपणामुळें आलेला नसून त्याच्यामागें योग्य कारणें आहेत हें आपण वर पाहिलेंच आहे. दुसरें असें कीं प्रत्येक प्रान्तांतून, विशेषतः बहुभाषिक प्रान्तांतून प्रान्तिक भाषेचें उच्चाटन करून उच्चशिक्षण हिंदींतूनच व्हाव असा प्रचार चालला आहे व त्यामुळें ही परंपरा इतर भाषिकांना आपली मायभाषा स्वतंत्र भारतांत वृद्धीस लागण्याऐवजीं मरून जाईल कीं काय अशी शंका येते. तिसरा मुद्दा असा आहे कीं हिंदी केन्द्रभाषा केल्यामुळें ज्यांची मातृभाषा ती आहे अशा लोकांना सरकार-दरबारीं व सर्व परीक्षांतून मोठा फायदा मिळतो व त्यामुळेंहि इतर भाषिकांना आपल्यावर उगीचच अन्याय झाल्यासारखें वाटतें.

### घटक राज्याची स्वभाषा,
### संघराज्याची इंग्रजी भाषा

हिंदुस्थानचा इतिहास लक्षांत घेऊन ह्या सर्व अड-चणींतून न्यायानें मार्ग काढला तर तो सर्वांना पसंत पडून, राजकीय दृढीकरणास मदत करणारा होईल असें वाटतें. त्याचें खालीं थोडक्यांत दिग्दर्शन करतें.

( १ ) हिंदुस्थानांत बोलल्या व लिहिल्या जाणाऱ्या तेरा भाषा त्या त्या प्रान्ताच्या भाषा म्हणून समजल्या जाव्या. ह्यांत उर्दू व इंग्रजीचा अंत-र्भाव होऊं नये. कारण ह्या दोन्हीहि प्रादेशिक भाषा नाहींत. कोणाहि माणसाला मातृभाषा म्हणून इंग्रजींत शिक्षण मिळूं नये.

( २ ) त्या त्या प्रान्ताच्या भाषेंत अगदीं सुरवाती-पासून तों उच्चतम पर्यंत शिक्षण त्या त्या प्रान्तांत व्हावें. घटक राज्य म्हणजे एकभाषिक किंवा द्विभाषिक प्रान्त ( होता होई तो एकभाषिक ) असे ठेवले तर त्या राज्याची बोध-भाषा व राज्यतंत्राची भाषा त्या प्रांताची भाषा असावी. ह्या प्रान्तांत कांहीं शहरांतून इतर भाषिक असले व त्यांची संख्या मोठी असली तर त्यांना स्वतःच्या भाषेंतून शिक्षणाची व्यवस्था व्हावी. कांहीं झालें तरी भाषिक आक्रमणाला उत्तेजन देऊं नये. तलवारीच्या जोरावर राज्य मिळवायचे दिवस गेले आहेत. आपण सर्व एका मोठ्या राज्याचे घटक आहोंत व लेखणीनें किंवा बेजबाबदार प्रचार करून घटक राज्याच्या सीमा वाढवण्याचा प्रयत्न करून आंतरप्रान्तीय वितुष्टें वाढविणें हें आत्म-घाताचें लक्षण आहे. पण त्याचबरोबर 'हिंदी नको' म्हटलें म्हणजे देशद्रोह केल्यासारखें होतें असें म्हणणेंहि सर्वस्वीं चूक आहे. सर्व भाषा एका पायरीवरच्या समजाव्या व कोणत्याहि एकीला केन्द्रीय भाषा म्हणून प्राधान्य देऊं नये

( ३ ) प्रत्येक घटकाची भाषा निरनिराळी झाली तर सर्वांना एकमेकांशीं संबंध ठेवण्यास व केंद्रीय राज्याची म्हणून एक भाषा हवीच. त्याशिवाय बाहेर-च्या जगाशीं राजकीय संबंध ठेवण्यास व पाश्चात्त्यांची विद्या हस्तगत करण्यास एका भाषेची आवश्यकता








आहे. ती इंग्रजी असावी. मॅट्रिकच्या आधीं तीन वर्षें ही भाषा शिकवण्यास सुरवात करावी. शिकवण्याचा उद्देश वाचतां यावें व सोपें बोलतां व लिहितां यावें इतकाच असावा. विद्यापीठांतील सर्व वर्गांना ही भाषा आवश्यक असावी व तेथेंहि उद्देश वाङ्मयीन प्रवीणता व सखोल अभ्यास नसून, फक्त शुद्ध लिहितां, बोलतां येणें व वाचतां येणें एवढाच असावा.

( ४ ) भारतांतील सर्व भाषा शक्य तितक्या लौकर एका लिपींत लिहिण्याची व्यवस्था व्हावी कोठ-च्याहि एका भाषेला प्राधान्य नसलें म्हणजे आपली लिपी सोडण्यास निरनिराळे भाषिक तयार होतील व एक लिपी झाली म्हणजे आंतरप्रांतीय वाङ्मय वाच-ण्याची जिज्ञासा उत्पन्न होईल. आंतरप्रांतीय सांस्कृतिक दळणवळण वाढून भारतीय संस्कृतींत भर पडेल.

ह्या योजनेनें सर्व भाषांना सारखें स्थान मिळेल. कोणत्याहि एका गटाचा भाषेमुळें फायदा होणार नाहीं. सर्वांचें शिक्षण **भारतीय भाषांमध्येंच** होईल. इंग्रजी फक्त आंतरप्रांतीय व आंतरदेशीय दळणवळणा-चें साधन राहील. इंग्रजी ही सर्वांनाच परकी अस-ल्यामुळें एकाला फायदा, एकाला तोटा असें होणार नाहीं. प्रत्येकाला स्वभाषा व इंग्रजी अशा दोनच भाषा शिकाव्या लागतील. हल्लीं तीन शिकाव्या लाग-तात. शिक्षणक्रम सुटसुटीत होतील. व सर्व देशाची लिपी एक झाल्यास बहुरूपी भारतीय संस्कृतीचा वाङ्मयद्वारा आस्वाद घेण्यास सर्व भारतीयांना सोपें जाईल. घटक राज्यांत जवळजवळ सर्व नोकऱ्या त्या त्या भाषिकांना मिळतील. कांहीं थोडे अपवाद होतील. पण इतरांना ज्या प्रान्तांत रहावयाचें तेथली भाषा शिकावी लागेल.

---

# इंग्रेजी कीं हिंदी ?

**म. म. द. वा. पोतदार**

डॉ. **इरावती कर्वे** यांनीं लिहिलेला 'भारतीय भाषा आणि त्यांचें भारतांतील स्थान ' या मथळयाचा लेख संपादकांनीं माझ्याकडे पाठवून त्याविषयीं मी आपले विचार लेखरूपानें मांडावे असा आपला मनो-दय कळविला. वास्तविक या भाषिक नीतीच्या प्रश्नांची चर्चा ' नवभारतां'त मी पूर्वी दोनतीन लेख लिहून केलेली आहे. माझ्या पूर्वींच्या लेखांतून मांडलेला युक्तिवाद अग्राह्य ठरण्यासारखा नवा युक्तिवाद पुढें आला तर त्याचा पुनर्विचार करणें अधिक उचित वाटलें असतें. तथापि कर्वे यांच्या वरील लेखांतील युक्तिवादाचा व विचारांचा परामर्श संपादकांच्या इच्छेस अनुसरून या लेखांत घेतला आहे.

" हिंदुस्थानांत बोलल्या व लिहिल्या जाणाऱ्या **तेरा** भाषा त्या त्या प्रांताच्या भाषा म्हणून सम-जल्या जाव्या, ह्यांत उर्दू व इंग्रजीचा अंतर्भाव होऊं नये, कारण ह्या दोन्हीहि प्रादेशिक भाषा नाहींत. कोणाहि माणसाला मातृभाषा म्हणून इंग्रजींत शिक्षण मिळूं नये " हा कर्वे यांचा पहिला निष्कर्ष साधारणपणें आम्हांला संमत होण्यासारखा आहे. ' तेरा भाषा ' यांतील ' **तेरा** ' हा आंकडा भारताच्या संविधानांतील आठव्या अनुसूचींत परिगणित असलेल्या चौदा भाषां-तून उर्दूला वगळून काढलेला असावा. पण या अनु-सूचित चौदा भाषांत ' संस्कृत ' हीहि एक भाषा आहे. तीहि उर्दूप्रमाणेंच प्रादेशिक भाषा म्हणून कोणी मानीत नाहीं. उर्दूबरोबर संस्कृतहि वगळावयास पाहिजे. तसें केलें म्हणजे प्रादेशिक संज्ञेला पात्र असलेल्या अनु-सूचित भाषांची संख्या **बाराच** होते, **तेरा नाहीं**. इंग्रजी आपली मातृभाषा म्हणणारे कांहीं लहान समाज भारतांत आहेत. पण ते हळूहळू इतर भाषिक समाजांत झपाट्यानें विलीन होतील असें भविष्य निःशंकपणें करितां येईल.

तथापि 'इंग्रजी ही केंद्रीय कारभाराची भाषा ठेवावी', मात्र ' मातृभाषा म्हणून इंग्रजींतून कोणास शिक्षण मिळूं नये ' या दोन्ही सूत्रांचा यथायोग्य मेळ बसविणें किती घोटाळयाचें होईल याचा विचार हीं सूत्रें पुर-








स्कारणारांनीं केलेला दिसत नाहीं.

इंग्रजींतून केंद्राचा कारभार चालावा, ' जगाशीं संबंध ठेवण्यासाठीं व पाश्चात्यांची विद्या हस्तगत करण्यासाठीं ' इंग्रजी असावी, हें म्हणणें स्वीकारलें तर मग जे आजच इंग्रजी भाषा ही आपली मातृभाषा म्हणून पुढें उभे ठाकले आहेत आणि तसा व्यवहार करीत आहेत त्यांना केंद्राची भाषा इंग्रजी ठरल्यावर केंद्राशीं लगट करून सर्व जागा धरून ठेवण्याचा मोह पडला तर नवल नाहीं. आणि मग 'आम्ही केंद्राची भाषा इंग्रजी ठेवूं परंतु तुमची मातृभाषा इंग्रजी असली आणि आम्हांला इंग्रजींतूनच केंद्रीय व्यवहार करावयाचा आहे तरी देखील तुम्हां इंग्रजी मातृभाषिकांना आम्ही कांहीं इंग्रजींत शिक्षण घेऊं देणार नाहीं' या म्हणण्यांत न्याय आणि सोय ती कोठें राहिली ? हळूहळू आम्ही सारेंच शिक्षण इंग्रजींतून घेऊं हा त्यांचा आग्रहच आपणांला मान्य करावा लागेल. किंबहुना, चौदा मान्य भाषांच्या जोडीला इंग्रजी हीहि मातृभाषा किंवा मान्य भाषा म्हणून जोडावी लागेल. हा परिणाम अटळ होऊन बसेल. सबब, हा असा पक्ष किंवा विचार त्याज्य ठरतो.

कर्वे यांनीं इंग्रजीसाठीं पुढील मांडणी केली आहे:–

( १ ) इंग्रजी ही केंद्रीय राज्याची भाषा असावी.

( २ ) बाहेरच्या जगाशीं संबंध ठेवण्यासाठीं इंग्रजी असावी.

( ३ ) पाश्चात्यांच्या विद्या हस्तगत करण्यासाठीं इंग्रजी असावी.

वरील तीन पैकीं ( २ ) आणि ( ३ ) कोणी अमान्य करणार नाहीं. आजहि तीच व्यवस्था चालू आहे. पण **आम्हांस कलम ( १ ) साफ अमान्य आहे** त्याबाबत विवेचन करण्यापूर्वी, कलम ( २ ) आणि ( ३ ) साठीं सेव्य जी इंग्रजी तिच्या शिक्षणाची तजवीज व धोरण ह्यांबाबत कर्वे यांची विचारसरणी प्रथम पाहूं. ती येणेंप्रमाणें आहे:

( १ ) विद्यापीठांत आणि इतरत्रहि इंग्रजी शिकवण्याचा उद्देश ' वाचतां यावें व सोपें बोलतां व लिहितां यावें इतकाच असावा. ' कारण इंग्रजी संबंधांत आपला उद्देश वाङ्मयीन प्रवीणता व सखोल अभ्यास नसून, फक्त शुद्ध लिहितां, बोलतां येणें व वाचतां येणें एवढाच आपण ठेवावा. आणि म्हणून ( २ ) मॅट्रिकच्या आधीं तीन वर्षें इंग्रजी ' शिकवण्यास सुरवात करावी. ' -- असें त्यांचें म्हणणें आहे.

आतां या निष्कर्षाचा थोडा समाचार घेऊं या.

केंद्रीय कारभारांत शिक्षण, संशोधन, अर्थव्यवहार, परराष्ट्रीय राजकारण, वकालती व्यवहार, संरक्षणाचे लष्करी व्यवहार, औद्योगिक नियोजन, त्याचप्रमाणें सर्व प्रकारचे कायदेकानू, न्यायनिवाडे इत्यादि कार्यांचा व जबाबदाऱ्यांचा समावेश होतो. आतां असला आणि एवढा व्यवहार इंग्रजींत करावयाचा तर त्याला इंग्रजीच्या पात्रतेची वरिष्ठ सेवकवर्गांत, अधिकाऱ्यांत, मंत्रिमंडळांत वगैरे कोणत्या कोटीची अपेक्षा असावी याचा विचार अवश्य केला पाहिजे. नुसतें सोपें व शुद्ध इंग्रजी लिहितां, बोलतां, वाचतां येण्यानें ही अपेक्षित योग्यता प्राप्त होईल काय ? किंवा अर्थशास्त्र, शिक्षण, राजकारण, युद्धशास्त्र, 'न्याय'शास्त्र इत्यादि शास्त्रांवरील इंग्रजींमधील मान्य ग्रंथ, विवेचनें, अहवाल, प्रतिवृत्तें, संदर्भग्रंथ उत्तम रीतीनें समजण्याइतकी, त्यांतील विवेचनाची मातब्बरी मापण्याइतकी आणि त्या प्रकरणीं आपली विचारसरणी आणि प्रमाणें पुढें मांडून त्यांची सुयुक्तिकता प्रस्थापित करण्याइतकी इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वशक्ति आपल्या केंद्रीय राज्याच्या आणि राज्यांगांच्या विविध सचिवालयांच्या सचिवांच्या आणि सचिवसेवकांच्या अंगीं असली पाहिजे कीं नको ? तसेंच पाश्चात्त्यविद्या हस्तगत करण्यासाठीं तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, आरोग्यशास्त्र वगैरे शेंकडों विषयांवरील उत्तमोत्तम इंग्रजी ग्रंथ तरी बिनचूक आणि लवकर निदान समजण्याइतपत तरी इंग्रजी भाषेवर प्रभुत्व आपल्या केंद्रापाशीं नको काय ?

या प्रकारच्या प्रश्नांचें उत्तर '**हो**'कारार्थी असेल तर मग हें अपेक्षित प्रभुत्व ' इंग्रजीचा सखोल अभ्यास ' केल्याशिवाय प्राप्त होईल काय ? पण इंग्रजी शिकण्याचा कर्वे यांचा उद्देश '**सखोल अभ्यास नसून**' फक्त **शुद्ध** लिहितां, बोलतां, वाचतां येणें एवढाच आहे व तशा शब्दांत त्यांनीं तो स्पष्ट केला आहे. कर्वे यांनीं आंखून दिलेल्या मर्यादेनें जर इंग्रजी शिक्षणाची व्यवस्था आपण केली तर आम्हीं जी केंद्रीय कारभाराची व जबाबदारीची कक्षा वर वर्णन कली आहे ती योग्य प्रकारें सांभाळली जाणें आम्हांस यत्किंचित्‌हि शक्य वाटत नाहीं.












येथें हेंहि लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं केंद्रीय सरकाराची भाषा इंग्रजी ठरविली तर केंद्रीय सरकार आणि प्रादेशिक सरकारें यांचा जो पारस्परिक व्यवहार व्हावयाचा तोहि उभयतांना इंग्रजींतून करावा लागेल. अर्थात् तो योग्य रीतीनें पार पाडण्यास प्रादेशिक सरकारांजवळहि इंग्रजीची योग्यता केंद्राच्या तोलाचीच असावी लागेल. कर्वे यांचा आग्रह प्रादेशिक सरकारांचा कारभार त्या त्या प्रदेशांच्या देशी भाषांतून चालला पाहिजे असा आहे आणि तो सर्वथा वाजवी आहे. मात्र त्याचवेळीं त्याच प्रादेशिक सरकारांवर सर्वथा परकीय अशा इंग्रजी भाषेंतून केंद्राशीं व्यवहार करण्याचें ओझें त्यांना प्रादेशिक सरकारांवर टाकावयाचें आहे. असें हें कुचक्र आहे आणि त्याच्या सर्व परिणामांची कांहींच मातब्बरी त्यांना भासली नसावी असें म्हटलें पाहिजे.

आम्ही हिंदीच केंद्रीय भाषा आणि सार्वभारतीय कामाची सार्वभारतीय भाषा म्हणजेच राष्ट्रभाषा म्हणून स्वीकार करून ही समस्या उत्तम प्रकारें सोडवली आहे. पण कर्वे यांना ती पटलेली नाहीं. कारण त्यांना असें वाटतें कीं " सर्व भाषा ( मराठी, हिंदी वगैरे ) एका पायरीवरच्या समजाव्या व कोणत्याहि एकीला केंद्रीय भाषा म्हणून प्राधान्य देऊं नये. "

हिंदी ही एक देशी भाषा आहे. 'मराठी, बंगाली, व गुजराती ' ह्या भाषा हिंदीपेक्षां ' अधिक संपन्न व प्रगल्भ ' आहेत, असें कर्वे यांचें म्हणणें आहे. मग केवळ बोलणारांची संख्या अधिक आहे एवढ्याच कारणासाठीं कमी प्रगल्भ अशी हिंदी केंद्रीय भाषा म्हणून कां स्वीकारावी ? एक तर ती अप्रगल्भ आणि दुसरें, ज्यांची मातृभाषा हिंदी आहे त्यांना " सरकारदरबारीं व सर्व परीक्षांतून मोठा फायदा मिळतो व त्यामुळेंहि इतर भाषिकांना आपल्यावर उगीचच अन्याय झाल्यासारखें वाटतें." या विभागांत ' उगीचच ' याचा अर्थ ' आपला कांहीं दोष नसतांना ' असा कर्वे यांच्या मनांत असावा. दुसरा जो ' निष्कारण ' असा उगीचच या पदाचा अभिप्राय आढळतो तो येथें लागूं नसावा. तेव्हां ' उगाच अशा कटकटींत पडण्यापेक्षां सरळ आपला परकीय इंग्रजीचा स्वीकार करा कसे!' असा कर्वे यांचा मनसुबा आहे. हिन्दीचा स्वीकार करतां त्या वेळीं तिचें साहित्य मराठी—बंगालीपेक्षां अधिक समृद्ध नाहीं हें माहीत असूनें उघड्या डोळ्यांनीं केला. यावेळीं हेंहि मान्य झालें कीं समजण्याला – शिकण्याला मराठी – बंगाली वगैरेपेक्षां सरळ हिन्दी - खडी बोली – फारच सोपी. ती रचनेला अतिशय लवचिक. तिच्या पोटांत रिचवणुकीला जागा मोठी. तिचा हा स्वभाव प्रसाराला फार उपयोगी. म्हणून हिन्दीचा स्वीकार केला.

आतां असें पाहूं कीं इंग्रजीचा स्पर्श होण्यापूर्वीच्या काळीं काय स्थिति होती ? एक-प्रदेश भाषी दुसऱ्या भाषिकांशीं त्या काळीं संपर्कांत येतच नव्हते ? उत्तरेचीं सैन्यें दक्षिणेकडे, दक्षिणेचीं उत्तरेकडे उतरत नव्हतीं ? मराठे अटकेवर पोंचले मग विभिन्नभाषी लोकांशीं ते व्यवहार कसा करीत ? विचारविनिमयाचें, बोलण्याचालण्याचें कांहीं समान साधन त्यांचेजवळ नव्हतें काय ? रामेश्वर ते पशुपतेश्वर, कन्याकुमारी ते बद्रिकेदार, आणि पुरी ते द्वारका याप्रमाणें हजारों यात्रिक तेव्हां जात, ते व्यवहार कसा करीत ? सावकारी पेढ्या मोठमोठ्या शहरीं चालत त्या कशा ? ज्ञानेश्वर, नामदेव, रामदास, एकनाथादि आमचे साधुसंत तीर्थयात्रा करून आले, इतकेंच काय अनेकांनीं कवनें हिंदींतहि केलीं यावरून कोणती साक्ष पटते ? व्यवहारांतला अनुभव असा कीं व्यवहारापुरती भाषा सहवासानें कामापुरती लवकर शिकून होते.

शिवाय जेथें समान संस्कृति, समान विचारधन, समान परंपरा, समान देवदेवता, समान व्रतोत्सव इत्यादि रूढ होऊन जातात तेथें एका भाषिकाला दुसऱ्या भाषिकाशीं लवकर समरस होतां येते. आणखी अत्यंत महत्त्वाची गोष्ट येथें लक्ष्यांत वागविली पाहिजे कीं मराठी, बंगाली, गुजराती, हिंदी या आर्यभाषाकुलांतील भाषांत थोड्याफार रूपांच्या फरकानें इतके अनेक शब्द सारखेच आहेत कीं या भिन्न रूपांचा व ठेवणीचा परिचय सहजांत होऊन जातो. द्रविडकुलांतील व आर्यकुलांतील भाषांसंबंधानें मात्र अडचण भासते. त्यांचा मिलाफ होत नाहीं थोडा शांतपणें अनुभव घेतला तर मराठी, बंगाली, उडिया, असमी, गुजराती, पंजाबी इत्यादि भाषांत वरवर जरी चटकन् न समजण्या-

१ पहा : राधाकृष्णन्-अहवाल पृ. 320/46 ' Hindi can not claim superiority over regional languages. '








सारखा भाग पुष्कळ असला आणि प्रथमप्रथम आपणांला बावरल्यासारखें झालें तरी एकमेकांना एकमेकांशीं जडून जाण्यास मोठे कष्ट पडत नाहींत. आमच्या संस्कृतीचा हा अमोल वारसा आहे. त्याचें महत्त्व आपल्याला अतिपरिचयामुळें लवकर ध्यानांत येत नाहीं. युरोपांतहि लॅटिन् कुलांतील भाषा वा सॅक्सन कुलांतील भाषा यांच्याबद्दल स्थूलमानानें असेंच म्हणतां येईल. समान आचारविचार, परंपरा यांच्यामुळें एका भाषेची ओळख दुसऱ्या भाषेला होण्यास विशेष विलंब किंवा आयास लागत नाहीं. हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे ? एखादी कोणचीहि लहान कथा बंगाली, मराठी, हिंदी, गुजराती वगैरे भाषांत एकासमोर एक लिहून ठेवा आणि पहा कीं केवळ एकभाषिकाला दुसऱ्यांतील किती अंश प्रथम प्रसंगांतच समजतो ? किती शिल्लक राहतो ? या योगें येणारा अनुभव फार उद्बोधक होईल. प्रत्यक्षांत एकतेची साक्ष अधिक दिसेल. कारण आपल्या देशी भाषांना मुख्य आधार संस्कृत-प्राकृतांचा. म्हणून गाभ्यांत एकता फार घट्ट. एकादा मोठा वंशवेल पहा. मूळपुरुष एक आणि मग सख्खे-चुलतक्रमानें प्रचंड विस्तार, मध्येंच पिढ्या तुटलेल्या; मग आपलेच आपल्या दशांतले वाटतनासे होतात. तसाच कांहींसा–सर्वस्वीं नाहीं–प्रकार या देशी भाषाकुलांचे प्रकरणीं मनांत आणला तर उलगड्याला थोडी मदत होईल. मात्र दृष्टान्त फार ताणतां कामा नये.

पण या साम्याच्या आणि जवळिकेच्या सर्व खुणा विसरून एकदम परक्या इंग्रजीच्या गळ्यांत कायमची मिठी मारण्याची कल्पना अत्यंत विपरीतच म्हटली पाहिजे. प्रगल्भतेचा मुद्दा आजची स्थिति पाहतां मान्य करावा लागेल. परंतु इतर देशी भाषांच्या बरोबरीची प्रगल्भता हिन्दीला प्राप्त करून देण्यास कितीसा उशीर लागेल ? बरें, हिन्दी एक देशी भाषा आणि अनेकांची मातृभाषा आहे हें मान्य केलें आणि प्रादेशिक कारभार प्रादेशिक भाषांतच चालला पाहिजे, उच्चतम शिक्षणहि प्रादेशिक भाषांतच झालें पाहिजे हा कर्वे यांचा आग्रहहि पत्करिला तर मग हिन्दीभाषी लोकांची भाषा अप्रगल्भ राहिली तरी भारताच्या दृष्टीनें तें कर्वे यांस किती हितावह वाटेल ? हिन्दीभाषी समूह अप्रगल्भ राहिला किंवा रेंगाळत मागें राहिला तर उच्चतम शिक्षण त्यानें हिन्दींतूनच घ्यावें हा आग्रह कितपत न्याय्य होईल ? किती फरकानें हा मागासलेपणा एकाद्या भाषिकसमूहांत राहूं देणें भारताच्या दृष्टीनें परवडेल ? हिन्दीचा हा अप्रगल्भपणा कांहीं अंशानें आमचा सर्वांचाच अप्रगल्भपणा ठरणार नाहीं काय ? तो भारताला बाधणार नाहीं काय ? आज आपण सर्व अप्रगल्भांना साहाय्य करण्यास कंकण बांधून उभें राहूं तरच आपला निभाव लागेल. उलट, जर आजची अप्रगल्भ हिन्दी लवकरच आमच्या मराठी-बंगाली-सारखी अगदीं पूर्णपणें नसली तरी बरीचशी प्रगल्भ केलीच पाहिजे, तर मग तिचा अप्रगल्भपणा हा चिरकालिक न समजतां अल्पकालिकच ठरेल, नव्हे तसें आपणांला घडवून आणावें लागेल. एवढ्याचसाठीं इंग्रजीच्या निर्गमनाला पंधरा वर्षांची मुदत संविधानांत घातली आहे. ही अगदीं गणितानें बरोबर उतरेल असें नाहीं. कदाचित् पांच कमी, पांच ज्यास्तहि होतील. पण याहून अधिक विलंब घातक ठरेल. मात्र पुनः **इंग्रजीकडे राज्यभाषा म्हणून तोंड फिरवावयाचें नाहीं हा कृतनिश्चय पाहिजे.** या प्रतिज्ञेवरच प्रयत्नांची शिकस्त केली पाहिजे.

कर्वे यांच्या मनांत आणखी एक भ्रम आहे. तो इतर अनेक मोठमोठ्यांच्याहि मनाला चिकटून बसला आहे. संविधानांत ' हिन्दी ' हें नांव आमच्या केंद्रीय सरकारी भाषेला दिलें आहे हें खरें आहे; आणि त्यांत चूक कांहीं नाहीं , हेंहि तितकेंच खरें आहे. हिन्दीभाषा हीच केन्द्रीय भाषा व्हावी असें म्हणणारांचा आग्रह नांवापुरता तरी या वाटेनें पुरविला गेला. पण या हिन्दीचा विकास कसा करावा याविषयीं स्पष्ट आदेशहि त्याच संविधानांत आहे. संविधानांतील एतद्विषयक सर्व कलमांचा साकल्यानें जो अर्थ स्पष्टपणें निघतो तो मुंबई–सरकारनें नेमिलेल्या 'हिंदी टीचिंग कमिटी'च्या अहवालांत तर्कशुद्ध पद्धतीनें विशद केला आहे. हा इंग्रजी अहवाल मुंबई–सरकारानें प्रसिद्धहि केला आहे, इतकेंच नव्हे त्यांतील मुख्य शिफारसी ठरावानें मान्यहि केल्या आहेत.

कोणीहि भारताचें मूळ इंग्रजी संविधान उघडून पाहावें आणि त्याच्या १७ व्या भागांतील ३५१ वी धारा लक्ष्यपूर्वक वाचावी. म्हणजे कळेल कीं भारताच्या संविधानाला ' हिंदी ' भाषेचा कोणता अर्थ अभिप्रेत आहे. हिंदीचा विकास करतांना ' **हिंदुस्तानी** ' आणि










अनुसूचित चौदा भाषांतील ग्राह्यांश घ्यावे व ते आत्मसात् करावे असा स्पष्ट आदेश आहे.

येथें नीट लक्ष्यांत घ्यावयाचें तें हें–आणि हाच मुद्दा सप्रमाणरीत्या मुंबई-अहवालांत स्पष्ट विवरण करून सिद्ध केला आहे–कीं संविधानाला अभिप्रेत हिंदी हिचें नांव ' हिंदी ' असें असलें तरी या हिंदीचा विकास ज्या चौदा भाषा अनुसूचित आहेत आणि ज्या चौदा भाषांत पुनः ' हिंदी ' हीहि एक भाषा म्हणून निर्देशिली आहे त्या हिंदीच्या साहाय्यानेंहि करावयाचा आहे. म्हणजे असें प्रथमदर्शनीं विसंगत आणि विचित्र वाटणारें विधान निष्पन्न होतें कीं **हिंदीचा विकास हिंदीनें** करावयाचा ! आतां या विधानाचा अर्थ स्पष्ट आहे कीं एकाच हिंदी नांवानें दोन भिन्न वस्तूंचा किंवा वस्तुप्रकारांचा निर्देश येथ केलेला आहे. पैकीं पहिली ३५१ मधील विकासविषय हिंदी ही **पोष्य हिन्दी** होय आणि दुसरी अनुसूचित हिन्दी ही **पोषक हिन्दी** होय. असा अन्वय स्पष्ट लागतो; आणि तो तसा लावल्याशिवाय संविधानाचा ग्रंथ लावतांच येत नाहीं. कोणी एकानेंहि सप्रमाणरीत्या दुसरा अन्वय लावून दाखविला नाहीं आणि तसें करतांना मुंबई-अहवालांतील अन्वय कसा चूक आहे तें दाखवून दिलेल नाहीं.

' पोषक ' हिंदी अनुसूचित वर्गांत आहे. या अनुसूचित भाषागणनांत चौदांपैकीं **बारा भाषा** उघड-उघड ज्या आज प्रादेशिक म्हणून गणल्या जातात अशाच आहेत; आणि म्हणून अनुसूचित हिंदी तिच्या जोडीच्या ज्या इतर अकरा अनुसूचित मराठी, बंगाली, गुजराती प्रभृति प्रादेशिक भाषा आहेत त्याप्रमाणेंच हीहि प्रादेशिक भाषाच गणली गेली पाहिजे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर असें कीं **प्रादेशिक हिन्दी किंवा मातृभाषा हिन्दी ही भारताची म्हणून स्वीकारलेली हिन्दी नव्हे.** अर्थात् प्रादेशिक किंवा मातृभाषा हिन्दीचा केंद्रिय भाषा म्हणून स्वीकार झालेला नाहीं. म्हणून कर्वे-प्रभृतींचें या प्रकरणीचें विवेचन या मुद्द्यापुरतें निर्मूल समजण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

मग तर काय दोन हिन्दी आहेत ? त्या निराळ्या भाषा आहेत ? तसें म्हणावें तर ' तिच्या आत्म्याला ढका न लावतां ' (' वुइदाउट इंटरफिअरिंग वुइथ् इट्स् जीनिअस् ' ) विकास साधावा असें जें ३५१व्या धारेंत संविधानानें स्वच्छ सांगितलें त्याचा उलगडा कसा ? याचें समाधान असें आहे कीं प्रादेशिक हिन्दी आणि दुसरीला आपण भारतीय हिन्दी म्हणूं या – या दोन अगदीं स्वतत्र एकमेकाशीं कसलाहि संबंध नसलेल्या भाषा नाहींत. मागें दर्शविलेंच आहे कीं गुजराती, मराठी, बंगाली, हिंदी वगैरे आज स्वतंत्र मानलेल्या आणि निराळ्या दिसणाऱ्या भाषा यांच्यांत कितीतरी जवळीक आह. विकसित गुजराती हिचें मूळच पाहूं गेलें तर राजस्तानींत आढळेल.

एका दृष्टांतानें आपली थोडी समजून पडते का पहा. समजा, एक एकमजली घर आहे. पुढें या मजल्यावर दुसरा मजला आपणांस चढवावयाचा आहे. खालच्या मजल्याला एकदोनच दारें आहेत. पण आतां वरच्या मजल्यावर आपणांस पुष्कळ दारें, खिडक्या, भोंवतालीं प्रदक्षिणामार्ग – अशी कांहीं नवीच रचना करावयाची आहे. तर आपण काय करूं ? पाया आहे तोच कायम ठेवूं आणि त्याच भक्कम पायावर वरील मजला सोईप्रमाणें रचूं. या मजल्यावर येण्यासाठीं आपणाला बारा जिने ठेवावयाचे आहेत तर ठेवूं. भिंतीऐवजीं सर्व जाळ्याच बसवूं. हे बारा जिने म्हणजे बारा भाषा समजा. प्रत्येक भाषेसाठीं एक एक निराळा जिना असून त्या त्या जिन्यानें त्या त्या भाषेंतील निवडक व पसंत केलेले शब्द, वाक्प्रचार इत्यादि ग्राह्यांश हिन्दीच्या या दुसऱ्या मजल्यावरील शब्दादि-सृष्टींत प्रवेश करून सेवा करितील. तळमजल्यावरील हिन्दीला आपलीं द्वारें उघडीं ठेवण्याची वा बंद करण्याचा किंवा नव्या खिडक्या वगैरे पाडण्याचा पूर्ण अधिकार राहील. पहिल्या किंवा तळमजल्यावर प्रादेशिक हिन्दी नांदेल. तिच्या पायावर बांधलेल्या वरच्या मजल्यांत भारतीय हिंदी नांदेल. वाटलें तर ती आणखीहि मजले चढवील. दोहींचा पाया एकच, आत्मा एकच. त्या पायाला किंवा आत्म्याला ढका न लावतां आमची भारतीय हिन्दी आपला ससार स्वतंत्रपणें चालवील. न जाणों, जिने काढून टाकून शेजारच्या बारा भाषांच्या बारा प्रासादांत ती मुक्त संचार वरच्यावर जोड-पूल बांधूनहि करील.

असो, 'दृष्टांत तितुका एकदेशी' असें श्रीसमर्थांनीं बजावलें आहे. मुद्दा, किती कल्पना मनांत उतरण्या-










पुरताच त्याचा उपयोग.

खडीबोली म्हणून जें हिन्दीच रूप आहे तेंच पूर्वापार भारतीय म्हणून परिचित आहे. एरवीं तळमजल्यावर अवधी, भोजपुरी, बुंदेली वगैरे किती तरी मंडळींची गर्दी आहे !

तात्पर्य, भारतीय हिंदी बहिष्कारवादी नसेल. ती सर्वसमावेशक, संग्राहक नीति प्रमाण मानून आपला संसार चालवील. तळमजल्यावरील मंडळींना जितकें सोंवळें परवडेल तितकें त्यांनीं ठेवावें.

प्रचंड वटवृक्षाच्या अनेक पारंब्याच वृक्षरूप होऊन बसतात. वृक्ष मूळचा एक असला तरी अनेकपणाचें वैभव दाखवितो. तसाच कांहींसा प्रकार येथें समजावा.

भारतीय हिंदी उंचहि वाढेल आणि आपले बाहू दूरवर पसरतहि जाईल. भारतीयांच्या साहाय्यासाठीं तिचा अवतार आहे. भारतीय हिन्दीचा विकास प्रादेशिक इतर भाषांच्या विकासाला कसलाहि प्रतिबंध न करितां घडून येईल अशी तजवीज करावयाची आहे.

पारिभाषिक शब्दांची अडचण मोठी आहे. प्रत्येक प्रादेशिक भाषा आपल्या घरीं कसल्याहि पारिभाषिक संज्ञा वापरो. आम्ही मात्र सर्वत्र भारतांत, निदान राज्यकारभारांत आणि आमच्या अखिलभारतीय सभांतून वगैरे एकच परिभाषा वापरूं. आणि आम्ही जरी बहिष्कारवादी नाहीं तरी ही **पारिभाषिक शब्दावलि आम्हांला आमच्या प्राचीन संस्कृत भाषेकडून घेतली पाहिजे** आणि तशी ती आम्ही आनंदानें घेऊं; आणि ती सर्वत्र भारतीय व्यवहारांत वापरूं.

असा खोल विचार करूनच आमच्या लोकप्रतिनिधींनीं हिन्दीचा निर्णय घेतला तो यथायोग्यच आहे. तो निर्णय परिपुष्ट करण्याच्या उद्योगाला उत्साहानें लागण्याऐवजीं परकीय इंग्रजीशीं सोइरीक जोडण्याची किंवा पुढें चालविण्याची उफराटी कल्पना आतां कोणी ऐकणार नाहीं.

घटनाद्रोह, हिन्दीद्रोह, देशद्रोह असा आक्रोश करण्याचें वा कोणाला भिवविण्याचें आम्हांला कांहींच प्रयोजन दिसत नाहीं. नडेल तिथें आम्हीच बनविलेली घटना बदलून घण्याचा आम्हांला अधिकार आहे. विचारस्वातंत्र्य आणि उच्चारस्वातंत्र्य केव्हांहि अखंडित राहिलें पाहिजे. आचारस्वातंत्र्यावर मर्यादा घालावीच लागते. औचित्य आणि सत्य या सर्वव्यापी मर्यादा असल्यानें त्या सांभाळल्याच पाहिजेत.

हिन्दीचा आम्ही स्वीकार केला, सार्वभारतीयांचा सार्वभारतीय व्यवहार ही तिची कक्षा ठरवून दिली, तिचें स्वरूप अखिलभारतीयांनीं आपल्या सोयीनें आणि सत्तेनें ठरवावयाचें. कोणा एका प्रदेशाची मातृभाषा म्हणजे भारतीय हिंदी नव्हे, पूर्वींहि आम्ही तिचाच आश्रय त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें करीत होतों. आतां आजच्या परिस्थितीला योग्य असा तिचा नवविकास आम्ही करूं. पण जवळची, घरची, सर्वसुलभ, हिन्दी टाकून इंग्रजीच्या गळयांत माळ घालणार नाहीं.

इंग्रजीचें महत्त्व आम्ही जाणतों. पोकळ अभिमानाच्या भरीं पडून तिकडे आमचें दुर्लक्ष्य होतां कामा नये. पण म्हणून प्रत्येकाच्या माथीं इंग्रजी मारावयाचें आम्हांला काहींच कारण नाहीं. पाश्चात्त्य ज्ञानाचें संपूर्णपणें हरण किंवा शोषण करून तें आम्हांला आमच्या प्रधान देशी भाषांत भरपूरपणें सांठवून ठेवावयाचें आहे. एका भाषेचें भांडें त्या ज्ञानानें भरलें कीं दुसऱ्या देशी भाषांत तें वितरित होईल अशी सुंदर व्यवस्था आम्हांस करावयाची आहे. ज्यांना अनेक भाषा लीलेनें शिकतां-शिकवितां येतात अशा चतुरांची संख्या आम्हांस पुरेशी आमच्यापाशीं हुकमी तयार पाहिजे. त्यासाठीं जागरूक प्रयत्न केले पाहिजेत. इंग्रजींतलें यत्किंचित् उपयोगी ज्ञान आम्ही वायां जाऊं देणार नाहीं अशी पक्की तजवीज आम्हांस करावयाची आहे.

जगाशीं घनिष्ठ संबंध जागृत ठेवण्यासाठीं सर्व आवश्यक त्या उपायांची योजना आम्हांस डोळसपणें केली पाहिजे. सरसकट प्रत्येकाला पावशेर इंग्रजीचें वांटप करीत राहणें चुकीचें आहे. **पण निवडक व लायक लोकांना इंग्रजींत आजच्यापेक्षांहि अधिक तरबेज करून ठेवणें आम्हांस अत्यावश्यक आहे,** त्यासाठीं ' इंग्रजीची सोय हवी पण सक्ति नको ' हें सूत्र आम्हीं निश्चित करून निर्धास्तपणें पुढें चाललें पाहिजे.

पण हें सर्व करीत असतां आम्ही हें पक्कें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं तसलें इंग्रेजीचें तरबेजीचें ज्ञान अंगीं मुरण्यास नुसतें सोपें आणि शुद्ध इंग्रजी लिहितां-वाचतां बोलतां येण्यानें तें साध्य होणार नाहीं. त्याला एक-दोन तपें इंग्रजी मुरविली पाहिजे.



अनुक्रमणिका






# इंग्रेजी कीं हिंदी ?

जेथें आपल्या घरच्या देशीभाषांत सर्व प्रजांना साक्षर करण्यासाठीं आम्ही अजून धडपडत आहोंत तरी करोडों रुपये आणि आणखी कित्येक वर्षें आम्हांला झटावें लागेल तेव्हां हें साध्य आम्ही साधूं शकूं मग तेथें परक्या इंग्रजीला केंद्रीय भाषा म्हणून राखून भलत्याच गर्तेत प्रजांना लोटण्यास आम्ही कदापि मान्यता देणार नाहीं. देशी भाषा शिकून आणि शिवाय इंग्रजीसारख्या परकीय भाषेचीहि जोड आम्ही करून घ्यावी म्हटलें तर मागील अनुभवांवरून किती वर्षें लागतील ? श्री ॲनी बेझंट यांनीं या यशःसंपादनाला निदान दोनशें वर्षें लागतील असा अंदाज सांगितला होता. तेव्हां हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागण्यानें आपलें नुकसान तर होईलच पण आपलें हंसेंहि झाल्या-शिवाय राहणार नाहीं.

इंग्रजी शिकण्याला लागणाऱ्या काळापेक्षां किती तरी कमी वेळांत आम्हांला हिन्दी शिकतां येते. लक्षावधि लोकांचीं आयुष्यें व्यर्थ प्राथमिक इंग्रजीच्या पायीं फुकट दवडणें म्हणजे एक राष्ट्रीय आपत्तिच समजली पाहिजे. तेव्हां असल्या व्यामोहांतून आपली जेवढी लवकर सुटका होईल तितका आपला लाभच समजला पाहिजे.

यद्यपि भारतीय हिंदी आणि प्रादेशिक हिंदी हे दोन प्रकार आम्ही वर स्पष्ट केले आहेत, तथापि त्याचें मूळ किंवा पाया एकच आहे. अर्थात् प्रादेशिक हिंदीभाषिकाला भारतीय हिन्दींत प्रावीण्य मिळविणें बरेंचसें सोपें जाईल. इतर भाषिकांना, विशेषतः द्राविड भाषाकुलांतील भाषिकांना तें बरेंच जड जाईल. पण इंग्रजी – अगदीं सोपें इंग्रजी देखील – शिकण्यापेक्षां हिंदी शिकण्यास द्राविडांनाहि कमी श्रम व वेळ लागेल. त्याप्रमाणें दक्षिण-भारत-सभा यशस्वी कार्य करीत आहे. सांस्कृतिक साम्य या कामीं पुष्कळ सहायक होतें. संस्कृताचा परिणाम द्राविड भाषांवर फारच झालेला आहे. तेलुगु, कन्नड, केरळी या द्राविड भाषांत संस्कृताचा भरणा फारच मोठा आहे. तमिळमध्येंहि आहेच पण जरा कमी. म्हणून तिकडील कित्येक विरोधी चळवळये 'द्रविड-कळहम्' ची चळवळ चालवितात. पण हे नायकार-मंडळ केवळ हिंदी भाषेलाच विरोध करतें असें नव्हे तर त्यांना सर्व आर्यमंडळ, संस्कृतादिभाषा वगैरेंचें उच्चाटन करून 'द्रविडिस्तान' स्थापन करावयाचें आहे. म्हणून त्यांनीं देवनागरींत लिहिलेल्या पाट्यांना-हि डांबर फासलें ! अशांना आततायी वगात गणून त्यांची तशीच संभावना कठोरपणानें केली पाहिजे. एरवीं अनेक समंजस द्राविड हिन्दीचा स्वीकार उत्सुकतेनें करीत आहेत. शिवाय पूर्व द्राविडभागांत इंग्र-जीचें प्रस्थ पूर्वींपासूनच माजलेलें आहे तेव्हां तें मोडून काढण्यास अधिक काळ लागेल. खेरीज हिन्दी - हिन्दी म्हणून गदारोळ करून आणि अनुनयावर भर देण्या-ऐवजीं निग्रहावर भर देण्याच्या नीतीमुळेंहि प्रतिक्रिया तीव्र होते. जेथें दुःख मोठें तेथें जरा हळुवारपणानेंच काम साधलें पाहिजे. अगदीं एकाएकीं एकेरीवर येण्यानें विरोध मात्र वाढतो.

कव यांना आपला इंग्रजीचा तोडगा फार 'सुटसुटीत' वाटतो. एक इंग्रजी आणि दुसरी स्वभाषा. पण 'इंग्रजी घेणें म्हणजे केवढा बोजा आणि अडचण आहे हें तर दाखविलेंच आहे. या एकट्या इंग्रजीचें ओझें – अगदीं सोपी इंग्रजी म्हटली तरी देखील – एवढें जड होईल कीं स्वभाषा+हिंदी यांच्या जोड-ओझ्यापेक्षांहि ते अनेकपटींनीं अवघड. शिवाय परकेपणा वगैरे भावनात्मक विचार आहे तो निराळाच.

'देवनागरी लिपि' संविधानांत स्वीकारलीच आहे. बरें कीं, देशी भाषांनाहि रोमन लिपीच लागू करावी असें स्पष्टपणें कर्वे यांनीं प्रतिपादिलें नाहीं. 'एक लिपि' व्हावी अशी मोघम भाषा त्यांनीं वाप-रली आहे. पूर्वी नेहरू-सुभाष-प्रभृति महान् 'देश-भक्तां'नीं रोमन् लिपीचा पुरस्कार चालविला होता, अर्थात् आंतरराष्ट्रीय दृष्टि, मुद्रणसुलभता इत्यादि अनेक मोहक फायदे या प्रकरणीं त्यांनीं दाखवून दिले होते. पण आतां 'रोमन्' पक्ष थंड झालेला दिसतो. पण देव-नागरी लिपीचा जर सर्व भारतीय भाषांसाठीं वापर होईल तर आपली भाषिक समस्या फार त्वरेनें सुटेल. हरप्रयत्नानें लोकांची समजूत पाडली पाहिजे. जेव्हां केंद्राचा व्यवहार देवनागरींत जोरानें होऊं लागेल, आणि मराठी-हिन्दी-प्रभृति नागरी-लिपिक प्रदेशांचा व्यवहारहि त्या लिपींतून जोरावेल तेव्हां फार न बोलतां, न सांगतां, आपोआपच इतरलिपिक नागरीकडे वळ-तील. यानें आपल्या प्रगतीचा वेग अतोनात वाढेल. तूर्त केंद्राचें या कामीं दुर्लक्ष्यच आहे म्हटलें तरी चालेल. पण नवें पाऊल टाकण्याची संविधानकार्नें












घातलेली घटका भरलेली आहे. तेव्हां कांहीं हालचाल झाल्याशिवाय राहणार नाहीं.

इंग्रजी की हिन्दी–हा प्रश्न वास्तविक सर्व आक्षेपांचा योग्य विचार करून कागदावर तरी उत्तर मांडून आपण सोडविला आहे. हिन्दीच्या बाजूनें राष्ट्र कौल देऊन चुकलें आहे. तथापि कोणाहि विचारकाला भिन्न मत मांडण्यास केव्हांहि मुभा राहिलीच पाहिजे. वास्तविक पाहतां 'इंग्रजी कीं हिंदी' हा प्रश्न आतां जिताजागता राहिलेला नाहीं. तो 'मृत' समजला तरी चालेल. तरी 'पूर्वनिर्णीत' 'रेस जुडिकेटा'चा न्याय तात्त्विक क्षेत्रांत केव्हांच लागू करू नये. म्हणून व्यवहारी जगांत जरी एखादा विचार 'मृत' कोटींत गेलेला असला तरी बौद्धिक अथवा तात्त्विक क्षेत्रांत कोणचाहि विचार कधींच 'मृत' समजला जात नाहीं. एवढ्याच साठीं जरी कर्वे यांनीं उपस्थित केलेल्या सर्व मुद्द्यांचा विचार होऊन गेलेला असला तरी पुनरपि विचार करण्यास चिंता नाहीं. त्यामुळें 'मृतमारणा'चा आक्षेप ग्राह्य ठरणार नाहीं. वैचारिक क्षेत्र हें अनिर्बंधच समजलें पाहिजे.

---

# इंग्रजी आणि हिन्दी

## डॉ. सुनीतिकुमार चतर्जी

भारतीय भाषाविषयक प्रश्न गेलीं कांहीं वर्षें अत्यंत गुंतागुंतीचा झाला असून अलीकडे तर त्या प्रश्नानें भारतीय राजकारणांत व शिक्षणक्षेत्रांत मोठें स्वरूप धारण केलें आहे. अशा या जटिल प्रश्नावर डॉ. इरावती कर्वे यांनीं अत्यंत समंजस आणि निर्विकार भूमिकेवरून विवेचन केलेलें आहे. यासारख्या प्रश्नावर मतें मांडतांना शास्त्रशुद्ध वस्तुनिष्ठ दृष्टिकोन आढळून येणें विरळाच. तो दृष्टिकोन डॉ. इरावती कर्वे यांच्या लेखांतून प्रत्ययास येतो हें विशेष होय. त्यांनीं या प्रश्नाचा वस्तुनिष्ठ अभ्यास करून आपलीं मतें प्रांजलपणें मांडलीं आहेत. त्यांचीं सर्वच मतें जरी आपल्याला मान्य झालीं नाहींत, तरी त्यांचा विचार होणें योग्य होय.

ज्या प्रदेशांतून जनतेची मातृभाषा हिंदी किंवा उर्दू आहे व तीच शिक्षणाची, राज्यकारभाराची, सार्वजनिक जीवनाची, वाङ्मयाची भाषा म्हणून स्वीकारली गेली आहे, त्या प्रदेशांतील लोक आपल्या हिंदीचें महत्त्व आज इतक्या जोरानें मांगत सुटले आहेत कीं, त्यामागें त्यांची आक्रमक वृत्ति दिसून आल्याशिवाय रहात नाहीं. त्यामुळें हा भाषाविषयक प्रश्न अधिकच गुंतागुंतीचा होऊन बसला आहे. भारत हें आपलें सर्वांचें एक-राष्ट्र आहे ही भावना सर्वसाधारण भारतीय नागरिकांच्या ठिकाणीं रुजली असून, एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेला एक भाषा असणें आवश्यक आहे ही भूमिकाहि सर्वांनीं स्वीकारिली आहे, हें खरें. परंतु हिंदी-भाषिकांची ही आक्रमक वृत्ति पाहून लोक भयाकुल झाले आहेत. डॉ. कर्वे यांनीं म्हटल्याप्रमाणें, हिंदीला देऊं केलेल्या स्थानाविरुद्ध जर कोणी बोलायला उठलें तर जणूं काय देशद्रोह होत आहे असें भीतिग्रस्त वातावरण उत्पन्न होऊं पहात आहे !

वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदी भाषा म्हणजे संस्कृतप्रचुर खडी बोली-हिंदी ही अगदीं अलीकडची भाषा आहे. १८५० पूर्वी तिला कांहींच महत्त्व किंबहुना अस्तित्वहि नव्हतें. ज्या कांहीं ग्रंथांमुळें खडीबोली हिंदीला कांहीं महत्त्व येऊं लागलें,

१ लेखकांनीं मूळ इंग्रजींतून पाठविलेल्या लेखाचा हा मुक्त अनुवाद आहे.— का. सं.








ते ग्रंथ ब्रिटिश राजकर्त्यांच्या प्रेरणेनें कांहीं उत्तर-हिंदुस्थानी पंडितांनीं रचले. हिंदीचें आधींचें जुनें प्राचीन वाङ्मय निदान चार निरनिराळ्या बोलींतून होतें. अवधी किंवा कोसली, पंजाबी, राजस्थानी ( डिंगल किंवा जुनी मारवाडी ) आणि व्रजभाषा या त्या चार बोली होत. या चार बोलींपैकीं व्रजभाषा हीच खरी खडी बोली हिंदीची सहोदर असून, इतर तीनहि बोली भाषाशास्त्रदृष्ट्या एकमेकांपासून भिन्न आहेत. पण गेल्या चार पिढ्यांच्या अवधींत, बंगाल व ओरिसाच्या पश्चिमेकडे, पूर्व पंजाबच्या पूर्वेकडे, गुजरात-महाराष्ट्र-तेलुगु-गोंड प्रदेशांच्या उत्तरेकडे, व नेपाळच्या दक्षिणेकडे असलेल्या प्रदेशांतील सर्वच भाषा व बोली यांनीं खडीबोली हिंदीचें श्रेष्ठत्व मान्य केलें आहे. आज भारतांतील सुमारें १५ कोट लोक हिंदीभाषी किंवा हिंदीचा उपयोग करणारे म्हटले जातात. हिंदी भाषिकांचा हा १५ कोटि लोकांचा ' हिंदी संसार ' समजला जातो. परंतु या १५ कोटीच्या ' हिंदी संसारा'पैकीं जेमतेम ५ कोटीच खरे हिंदीभाषी म्हणतां येतील. या पांच कोट लोकांत दोन प्रकारच्या लोकांचा समावेश होतो. एक म्हणजे उत्तर हिंदुस्थान व दक्खन यांतून विखुरलेले बहुतेक मुसलमान व कांहीं हिंदु—ज्यांची भाषा उर्दू आहे असे. दुसरे म्हणजे कनौजी, व्रजभाषा, बुंदेली, जनपद – हिंदुस्थानी, जातु किंवा बांगरू या ' पश्चिम हिन्दी ' भाषा बोलणारे लोक. उत्तर हिंदुस्थानांतील वरच्या निवडक वर्गावर परवांपरवांपर्यंत मुस्लिम प्रवृत्तीचा व संस्कृतीचा प्रभाव पडला होता. त्यांची भाषा उर्दू आहे. हें त्याचें प्रतीक होय. अलीकडे हिंदु पुनरुज्जीवनाच्या चळवळीमुळें, वरील उर्दू-भाषिकांपैकीं हिंदुलोक एक नवीनच भाषा – एका बाजूला बंगाली, गुजराती, मराठी यांच्या व दुसऱ्या बाजूला जुनी अवधी व जुनी व्रजभाषा यांच्या पंक्तींत जाऊन बसूं शकेल अशी – निर्माण करीत आहेत. पश्चिम हिंदी बोली बोलणारे – विशेषतः दिल्लींत व दिल्लीच्या आसपास रहाणारे, मीरत, रोहिलखंड पूर्व पंजाब यांतून रहाणारे लोक—त्यांतील हिंदूसुद्धां फारशीप्रचुर हिंदी बोलतात. मुसलमान राज्यकर्त्यांशीं संबंध आल्यापासून, गेलीं पांच शतकें संस्कृतचा अभ्यास नामशेष होऊन फारशीचा अभ्यास वाढत गेल्यामुळें तेथील हिंदूंच्याहि ही फारशीप्रचुर भाषा अगदीं अंगवळणीं पडून गेली आहे. पूर्वेकडील अवधी आणि बिहारी बोली बोलणाऱ्यांची मात्र अशी प्रवृत्ति बनली नाहीं. फारशीप्रचुर पश्चिम हिंदीच्या कक्षेबाहेरील हे लोक, त्याचप्रमाणें आर्यसमाजासारख्या हिंदु—पुनरुज्जीवनवादी संघटनांनीं प्रभावित झालेले पंजाबमधील व दिल्ली-मीरत-बुंदेलखंडमधील लोक—हे आज संस्कृतशीं नष्ट झालेला संबंध पुन्हां प्रस्थापित करीत आहेत. हिंदी भाषेला संस्कृतचा वारसा पुन्हां प्राप्त करून देऊन, उर्दू वातावरणापासून ती मुक्त करून बंगाली, मराठी, गुजराती या भाषांच्या पंक्तीला तिला आणून ठेवण्याच्या महान् आंदोलनाला याच लोकांचा जोराचा पाठिंबा आहे.

म्हणूनच हिंदी भाषेचा निर्विकार दृष्टीनें अभ्यास होणें आवश्यक आहे. पण आज दुर्दैवानें या भाषेच्या अभ्यासाच्या बाबतींत राजकीय पूर्वग्रह, अभिनिवेश यांचा पगडा बसून आपली दृष्टि इतकी गढूळ झाली आहे कीं, वस्तुस्थितीकडे तीमुळें आपली डोळेझांक होत आहे. त्यामुळें निर्विकार दृष्टीनें या प्रश्नाचा अभ्यास करणारे विरळाच आढळतात.

हिंदी भाषेच्या प्रश्नाबाबत आज परिस्थिति थोडक्यांत मांडावयाची तर अशी मांडतां येईल :

(१) भारतीय राज्यघटनेंत देवनागरी लिपींतील खडी-बोली हिंदी ही भारतीय संघराज्याची भाषा असावी असें नमूद केलें आहे. मात्र आरंभीं पंधरा वर्षे इंग्रजी राहूं द्यावयाची आहे.

(२) खडी बोली हिंदीला स्वतंत्र भाषेचें—स्वतःचें कांहीं वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मय जींत आहे अशा भाषेचें—

स्थान अलीकडे १५० वर्षांतच आलें आहे. त्या आधीं, खडी बोलीला अशा वाङ्मयीन भाषेचें स्थान मिळण्याच्या खूप आधींपासून, गंगेच्या खोऱ्यांतील प्रदेश, गंगेच्या खोऱ्याच्या दक्षिणेकडील प्रदेश व राजपुताना, माळवा – या भागांतील भाषा व बोली भरभराटीस आलेल्या होत्या व त्यांच्यांत समृद्ध असें पंडिती व लोकवाङ्मय निर्माण झालें होतें.

( ३ ) खडी बोली हिंदी ज्यांची मातृभाषा आहे असे लोक, विशेषतः शहरांतून रहाणारे लोक–यांची भाषा आतांपर्यंत फारशीप्रचुर उर्दू होती. संस्कृत-प्रचुर हिन्दी त्यांना एक नवीन भाषेसारखीच वाटते. परंतु आज 'हिन्दी संसारा' मध्यें स्वतःची गणना करून घेणाऱ्या लोकांना, विशेषतः मैथिली, मागधी, भोजपुरी, छत्तीसगडी, बघेली, अवधी, गढवाली, कुमावनी, राजस्थानी बोली, हिमालयी बोली ह्या ज्यांच्या मातृभाषा आहेत अशा लोकांना आज संस्कृतप्रचुर हिन्दीबद्दल जिव्हाळा वाटूं लागला आहे.

( ४ ) हिन्दी भाषेच्या स्वरूपाबद्दल आज तीव्र स्वरूपाचा झगडा चालूं आहे. एका बाजूला उर्दू वळणाची पश्चिमी हिन्दी आणि दुसऱ्या बाजूला खडी बोली हिन्दी असे दोन तट निर्माण झाले आहेत. संस्कृतप्रचुर हिन्दीचा कॅांग्रेसनें व लोकसभेनें स्वीकार केला असून सरकार-दरबारीं तिला मान्यता मिळाली आहे. ही संस्कृतप्रचुर हिन्दी इतर भाषिकांना, उदा० आसामी, बंगाली, ओरिया, गुजराती, मराठी या भाषांच्या भाषिकांना तसेंच तेलगु, कन्नड, तामिळ, मल्याळी या द्राविडी भाषा बोलणाऱ्यांनाहि समजूं शकते; कारण या सर्व भाषिकांनीं आपली संस्कृत-ची परंपरा कायम राखिली आहे. असें असूनहि फारशीप्रचुर उर्दू वळणाच्या हिन्दीचा वापर सिनेमांमधून व शहरवासी सुशिक्षित लोकांच्या बोलण्यांतून जोरानें चालूच आहे.

हिन्दीभाषिक प्रदेशांमधून सर्वच्या सर्व इंग्रजी शास्त्रीय पारिभाषिक शब्दांऐवजीं संस्कृत किंवा नवसंस्कृत पारिभाषिक शब्द योजून हिंदीचें आधुनिकीकरण करावयाचे प्रयत्न हल्लीं जारी आहेत. शास्त्रीय पारिभाषिक इंग्रजी शब्दांऐवजीं संस्कृत शब्द उपयोगांत आणले कीं भाषा आधुनिक झाली असें कांहीं सज्जनांना वाटतें. पण भाषा जर खरी आधुनिक बनायची असेल तर ती भाषा बोलणारे लोक स्वतः आधुनिक वृत्तीचे बनले पाहिजेत, मध्ययुगीन व मागासलेली मनोवृत्ति व प्रवृत्ति त्यांनीं सोडून दिली पाहिजे. मध्ययुगीन मनोवृत्तींतून लोकांची मुक्तता व त्या लोकांच्या भाषेचें आधुनिकीकरण खऱ्या लोकशिक्षणानेंच होऊं शकेल. उत्तर हिंदुस्थानांतील आपला 'हिंदी संसार' थाट-णाऱ्या लोकांची सर्व भारताला आपण मार्गदर्शन करावें अशी इच्छा आहे खरी. परंतु त्यांनीं जी खडी – बोली हिन्दी स्वीकारली आहे ती अगदीं अलीकडची आहे. ती भाषा स्वीकारून तिचें संवर्धन करावयास जेमतेम दोनतीन पिढ्याच झाल्या अस-तील. हे स्वतः हिंदीभाषी लोक भारतांतील इतर भाषिकांच्या मानानें पुढारलेले नाहींत; उलट, पुष्कळ बाबतींत समुद्र किनाऱ्यालगतच्या प्रदेशांतील भाषिकां-च्या मानानें ते मध्ययुगीन वाटण्याइतके मागसलेले आहेत. त्यामुळें हिन्दीचें आधुनिकीकरण व्हायच्या आड पुष्कळच अडचणी आहेत. आज तर अशी स्थिति आहे कीं, इतर भाषिकांना हिन्दी ही स्फूर्ति-स्थान बनावयाच्या ऐवजीं कुचंबणेला व अडवणुकी-लाच कारण होऊं पहात आहे. माझा तर असा अनुभव आहे कीं, दुय्यम शाळांतील खालच्या इयत्तांतील मुलांना बंगाली व हिन्दी या दोन्हींहि सजातीय भाषा एकाच वेळीं शिकविल्यामुळें कोणतीहि एक भाषा मुलाला नीट शुद्ध येत नाहीं. म्हणून मी तरी अशी शिफारस केली आहे कीं हिन्दी भाषा विद्यार्थ्याला कॅालेजमध्यें गेल्यावर, मातृभाषा त्याला साधारणपणें चांगली येऊं लागल्यावरच शिकवावी.










हिन्दीतर भाषिकांच्या प्रदेशावर एका नवीन हिन्दी भाषेचें ओझें लादून बौद्धिक दृष्ट्या कांहींहि फायदा होणार नाहीं. अखिलभारतीय नोकऱ्यांच्या परीक्षांना हिंदीचें ज्ञान आवश्यक राहील पण तें केवळ एक भूषण म्हणून. बंगाली, मराठी, ओरिया, तामीळ इत्यादि ज्यांच्या मातृभाषा आहेत अशा भाषिक लोकांच्या प्रदेशांत अखिलभारतीय शैक्षणिक कारभारांमध्यें सध्यांच्या इंग्रजीऐवजीं हिन्दी प्रस्थापित करण्याचा प्रश्नच उद्भवूं शकत नाहीं. हिन्दीभाषी लोकांनाहि इंग्रजीची अगदीं जिव्हाळ्याची गरज आहे. इंग्रजी भाषा हें आज जागतिक संस्कृतीचें अत्यंत महत्त्वाचें वाहन आहे. कांहीं भाषा खरोखरीं इतक्या प्रगत अवस्थेला पोहोंचलेल्या असतात कीं त्यांचा नुसता परिचयहि आपल्या मानसिक शक्तींच्या विकासास कारणीभूत होतो. इंग्रजी भाषा ही अशी आहे. इंग्रजी भाषा चांगली अवगत होण्यानें बुद्धीला तर उत्तम वळण लागतेंच; याशिवाय जो बौद्धिक ज्ञानलाभ होतो त्याचें महत्त्व व उपयोग खूपच आहे. आज इंग्रजी भाषा अशा एका श्रेष्ठ अवस्थेला पोहोंचली आहे कीं ती आज विश्वज्ञानाचीच भाषा (encyclopaedic) झाली आहे. जगांतील सर्व प्राचीन, अर्वाचीन, मध्ययुगीन व आधुनिक कला व शास्त्रें इंग्रजींत केन्द्रित झालीं आहेत. आधुनिक विचार प्रकट करावयाला अत्यंत सामर्थ्यशाली माध्यम इंग्रजी भाषा होय. आधुनिक युगधर्म आत्मसात् करायचा असेल, जे जे कांहीं महान् (विचार व कृति) जगांत होऊन गेलें असेल तें अवगत करून घ्यावयाची वृत्ति जर अंगीं बाणवावयाची असेल तर इंग्रजी येणें हें अपरिहार्य आहे. म्हणून आपल्या उच्च शिक्षणाच्या क्षेत्रांत इंग्रजीचें चांगलें ज्ञान प्रत्येक विद्यार्थ्याला असलें पाहिजे अशी व्यवस्था झाली पाहिजे. चांगलें ज्ञान याचा अर्थ असा कीं, विद्यार्थ्यांना इंग्रजी चांगलें वाचतां येऊन समजलें पाहिजे व इंग्रजी भाषेंत शुद्ध व परिणामकार रीतीनें आपले विचार प्रकट करतां आले पाहिजेत.

बंगाली भाषेसंबंधीं मी सांगूं शकतों. गेल्या १०० वर्षांत जे उत्तम बंगाली लेखक होऊन गेले ते इंग्रजीचे उत्तम पंडित होते. बंगाली भाषेच्या रोमरोमांतून आढळून येणारे आधुनिक विचार आणि आधुनिक दृष्टि लेखकांच्या इंग्रजीवरील प्रभुत्वामुळेंच प्राप्त झालीं आहेत. त्यामुळें बंगाली वाङ्मय अतिशय समृद्ध झालीं असून बंगाली भाषेला अत्यंत आधुनिकांतला आधुनिक विचार प्रकट करण्याचें सामर्थ्य आलें आहे. म्हणून माझ्या मतें, माध्यमिक शाळांपासून पुढें इंग्रजी हा विषय आवश्यक ठेवावा. अर्थात् ज्या विद्यार्थ्यांना पुढें उच्च शिक्षण घ्यावयाचें नाहीं, लहानलहान धंद्यांचें शिक्षण घ्यावयाचें आहे, त्यांना इंग्रजी आवश्यक ठेवलें नाहीं तरी चालेल.

सर्व शिक्षण—अगदीं उच्चतम शिक्षणदेखील मातृभाषेंतूनच झालें पाहिजे हें डॉ. कर्वे यांचें म्हणणें मला मान्य आहे. परंतु सध्यांच्या परिस्थितीचा विचार करतां इतर बाह्य जगाशीं आपला संबंध तुटायचा नसेल तर शास्त्रें आणि सांस्कृतिक विषयांचे अभ्यासक्रम यांचें शिक्षण दोन भाषांच्याच आधारें करणें इष्ट व व्यवहार्य होईल म्हणजे मातृभाषेंतून शिक्षण द्यावयाचें पण शास्त्रीय पारिभाषिक शब्द नेहमीं इंग्रजीच ठेवायचे असें करावें लागेल. भारतीय भाषांतील पारिभाषिक शब्द वापरण्याची प्रक्रिया ही हळंहळुं क्रमानेंच व्हायला पाहिजे. नाहींतर घिसाडघाईनें सबंध शिक्षणाचीच घडी विसकटून गोंधळ माजेल. परिभाषिक शब्दांच्या बाबतींत, विशेषतः भौतिक शास्त्रांतील परिभाषेच्या बाबतींत आपण आपली मनोवृत्ति उदार ठेविली पाहिजे. जास्तींत जास्त संग्राहक वृत्ति बाळगली पाहिजे. आधुनिक शास्त्रें व त्यांच्या 'प्रयोगशाळा' या आपण पाश्चात्यांकडूनच घेतल्या आहेत. म्हणून चिन्तनशील तात्त्विक शास्त्रांची आणि 'प्रयोगशाळां'ची बरोबरी








परिभाषा युरोपकडून, विशेषतः इंग्लंडकडून आपण घेणें क्रमप्राप्त आहे. भाषेच्या बाबतींत सोंवळेपणाची, 'अस्पृश्यते'ची वृत्ति सोडली पाहिजे. नवीन संशोधनांत आढळून येणाऱ्या गोष्टी व त्यांची प्रक्रिया यांची परिभाषा इंग्रजीच ठेवावयास हरकत नसावी. तत्त्वज्ञान किंवा इतर विचारप्रधान विषयांच्या बाबतींत आपण आपली स्वतःची परिभाषा वापरावयास हरकत नाहीं. परंतु तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत देखील युरोपमध्यें कांहीं विशिष्ट पारिभाषिक शब्द प्रचारांत आले आहेत. उदाहरणार्थ, प्लेटोच्या ' आयडिआज् ', प्रॅग्मॅटिझम्, आयडिआलिझम्, डायलेक्टिकल मटीरिआलिझम्, पॉझिटिव्हिझम्, अशासारख्या शब्दांचा अर्थ दुसरे शब्द वापरून अचूकपणें व्यक्त करणें शक्य नसतें. म्हणून अशासारखे शब्द आपण आपल्या तत्त्वज्ञानपरिभाषेंत स्वीकारायला हरकत नसावी.

सारांश, एकंदर सर्व गोष्टींचा विचार करतां, आपल्या शिक्षणपद्धतींत कोणत्या भाषांचा अवलंब करावा या बाबतींत पुढील सूचना कराव्याशा वाटतातः

( १ ) प्रादेशिक भाषेंतून किंवा मातृभाषेंतून सर्व शिक्षण—उच्चतम शिक्षण देखील दिलें जावें.

( २ ) जे विद्यापीठांत प्रवेश करणार असतील, त्यांना इंग्रजी ही परकीय भाषा आवश्यक ठेवावी. कॉलेजांतून इंग्रजी पाठ्यपुस्तकें ठेवावींत. वर्गांत शिकवतांना दोन भाषांचा अवलंब करावयास परवानगी द्यावी; आज तर तसें करावयास प्रोत्साहन देखील द्यावें.

( ३ ) अँग्लो-इंडियनांसारखे जे घरींदेखील इंग्रजी बोलत असतील त्यांना इंग्रजींतून शिकवावें. परंतु हायस्कूल-शिक्षणांत व त्यानंतर त्या त्या प्रादेशिक भाषेचा अभ्यास एक महत्त्वाचा विषय म्हणून त्यांनीं केलाच पाहिजे.

( ४ ) डॉ. इरावती कर्वे यांनीं, ज्यांची मातृभाषा इंग्रजी आहे, अशा भारतीय नागरिकांच्या बाबतींत असें सुचविलें आहे कीं त्यांना अनुकूल करून घेऊन त्यांना हळुंहळुं प्रादेशिक भाषेचा स्वीकार करावयास लावावें. या त्यांच्या सूचनेंत बरेंच तथ्य आहे यांत शंका नाहीं. पण ही परिस्थिति अमलांत यायला बराच काळ जावा लागेल. तोंपर्यंत या लोकांवर कोणत्याहि प्रकारची सक्ती असतां उपयोगी नाहीं.

(५) डॉ. कर्वे यांनीं अशी सूचना केली आहे कीं, कोणत्याहि घटक राज्यांतून शाळा व कॉलेजें यांवर परकीय मिशनऱ्यांचें वा कोणा अ-भारतीय माणसांचें नियंत्रण असूं नये. ही सूचना मला पूर्णपणें मान्य आहे. मिशनऱ्यांनीं चालविलेल्या संस्थांतून, जे घरीं देखील इंग्रजींतून व्यवहार करतात असे कांहीं अँग्लोइंडियन्स – सारखे लोक वगळून इतरांना इतर शिक्षणसंस्थांतल्याप्रमाणें प्रादेशिकभाषेंतून शिक्षण दिलें पाहिजे.

(६) विद्यापीठांत ज्यांना पुढें सांस्कृतिक विषयां-(Artrs)चा अभ्यास करावयाचा आहे त्यांना संस्कृतसारखी प्राचीन भाषा हायस्कूलमध्यें आवश्यक ठेवावी.

(७) कॉलेजशिक्षणाच्या आधीं हिंदी आवश्यक ठेवूं नये. विशेषतः अखिलभारतीय नोकऱ्यांकरितां जे अभ्यास करतील त्यांना हिंदी आवश्यक ठेवावी. अखिलभारतीय नोकऱ्यांकरितां हिंदीतरभाषिक विद्यार्थ्यांना हिंदी आवश्यक केली गेली, तर त्याच बरोबर हिंदीभाषिक विद्यार्थ्यांना भारतीय संघराज्यानें मान्य केलेल्या भाषांमधून हिंदी व उर्दू यांशिवाय कोणती तरी एक भाषा आवश्यक ठेवावी.

(८) परकीयांसमोर आपल्या स्वाभिमानरक्षणाकरितां म्हणून हिंदी ही राष्ट्रभाषा समजली जावी. हल्लीं तरी हिंदीला हिंदीतरभाषिकांच्या दृष्टीनें केवळ मिरविण्याचें साधन किंवा अलंकार याशिवाय जास्ती किंमत नाहीं. विद्यापीठीय उच्च शिक्षणांत, कायदेशास्त्र व राज्यकारभार याबाबतींत इंग्रजीची जागा












हिन्दी घेऊं शकणार नाहीं. मध्यवर्ती लोकसभेंत देखील, जेव्हां हिन्दीतरभाषिक सदस्यांपैकीं शेंकडा ८० सदस्य लोकसभेंत इंग्रजीऐवजीं हिंदींतून भाषण करावयाचें स्वखुषीनें पसंत करतील, तेव्हांच हिंदी ही राज्यकारभाराची वा सरकारदरबारची भाषा म्हणून उपयोगिली जावी. नाहींतर अनेक अडचणी उत्पन्न होऊन भारताच्या लोकसभेंतील कामच थांबेल !

भारतीयांत हिंदीचा अभ्यास व प्रसार होण्याची गरज नाहीं असें डॉ. इरावती कर्वे यांना सुचवावयाचें आहे. तसें मात्र मला वाटत नाहीं. माझ्या मतें, हिंदीभाषिकेतर लोकांत जसा हिंदीचा प्रसार झाला पाहिजे, तसाच व त्याचबरोबर हिंदीभाषिकांत हिंदी किंवा उर्दूशिवाय इतर भारतीय भाषेचाहि प्रसार होणें आवश्यक आहे.

भाषेपेक्षां जीवन अधिक महत्त्वाचें आहे. सर्व जगांत एक राज्य, सर्व जगांत एक जागतिक संस्कृति या ध्येयाकडे आपलीं पावलें वेगानें पडत आहेत. अशा वेळीं इंग्रजीला बिचकण्याचें कारण नाहीं. आज आपल्यापुढें हिन्दी व इंग्रजी दोन्हीहि आहेत. परंतु इतिहासप्राप्त परिस्थिति अशी आहे कीं, आज अखिलभारतांत तसेंच परराष्ट्रीय व्यवहारांत इंग्रजीला अधिक महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें आहे. अशा परिस्थितींत इतर भारतीय भाषांपेक्षां हिंदीमध्यें गुण व संख्या या दृष्टीनें विशेष श्रेष्ठत्व आढळून आलेलें नसतां, हिंदीला इतर भाषांच्यापेक्षां उच्चासनावर नेऊन बसविणें हें भारतीय ऐक्यसंवर्धनास पोषक होणार नाहीं. आपल्या जीवनांतील हरएक दालनांतून किती तरी पाश्चात्त्य गोष्टी रुळलेल्या दिसून येत असतांना, इंग्रजी भाषा चालू ठेवण्यानें आपली राष्ट्रीय भावना दुखावेल असें समजण्याचें कारण नाहीं.

भारतीय विद्यार्थ्याला ज्या अनुक्रमानें भाषा शिकवाव्यात असें मला वाटतें तो क्रम असा : ( १ ) मातृभाषा ( २ ) इंग्रजी ( ३ ) प्राचीन ( संस्कृत ) भाषा ( निवडक विद्यार्थ्यांकरितां ) ( ४ ) मातृभाषेशिवाय एक भारतीय भाषा. हिंदीतर भाषिकानें हिंदीच घेतली पाहिजे. ज्यांची मातृभाषा इंग्रजी आहे त्यांनीं इंग्रजीशिवाय एक प्रादेशिक भाषा शिकली पाहिजे.

# हिन्दी आणि कांहीं इंग्रजी

## श्री. मास्ती वेंकटेश आयंगार

प्रस्तुत[1] भाषाविषयक प्रश्न असा आहे कीं त्यावर कितीहि विस्तृत चर्चा केली तरी मतैक्य होईल असें नाहीं. म्हणून प्रा. इरावती कर्वे यांनीं उपस्थित केलेल्या मुद्द्यांबाबत चर्चा न करतां त्याबाबतची माझी भूमिका संक्षिप्तपणें मांडतों :

(१) आपल्या भारतीय घटनेंत ज्या भाषांचा निर्देश केला त्या सर्वत्र भाषा चांगल्या विकसित आहेत. त्यांच्यांत आपला सर्व भारत येऊन जातो. त्या त्या प्रदेशाच्या भाषेचा उपयोग त्या प्रदेशांत सर्व कामांकरितां केला जावा: शिक्षण, राज्यकारभार, कोर्टें, व्यापार इत्यादि–किंबहुना, लोकांना ज्या ज्या कामाकरितां भाषेची गरज लागते त्या त्या सर्व कामांकरितां प्रादेशिक भाषा उपयोगांत आणिली जावी.

(२) अखिलभारतीय कामकाजाकरितां सर्वांची एक भाषा हिन्दी ही असावी. आज या कार्याकरतां हिन्दी जरी वि ष समर्थ दिसत नसली, तरी आपल्या सर्वांच्या वापरण्यामुळ पुढें तिच्यांत सामर्थ्य येईल.

(३) इंग्रज राज्यकर्ते असतांना इंग्रजी जशी सर्वांची एक भाषा होती, तशी ती आतां होऊं शकणार नाहीं. ज्या परिस्थितींत आपल्या राष्ट्रानें इंग्रजी भाषा स्वीकारली होती ती परिस्थिति संपूर्णपणें शंभर टक्के कृत्रिम होती. ती परिस्थिति आज

१ मूळ इंग्रजींतून पाठविलेल्या टिपणाचा हा अनुवाद आहे. का. सं.








उरलेली नाहीं.

(४) पण जगाशीं आपलें दळणवळण ठेवण्याकरितां कांहीं प्रमाणांत आपण इंग्रजी ठेविलें पाहिजे. आपणांपैकीं कांहींनीं तर फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश, रशियन, इटालियन, जपानी, चिनी, ब्रह्मी या भाषांचा अभ्यास केला पाहिजे.

(५) मातृभाषेशिवाय इतर भाषा 'डायरेक्ट मेथड'नें शिकवाव्यात. त्या भाषांतून सामान्यपणें बोलतां येणें, सर्वसाधारण बोललेलें समजणें, पत्रें-वृत्तपत्रें वाचतां येणें एवढाच या इतर भाषांच्या अभ्यासामागें हेतु असावा. अर्थात् ही सूचना करतांना माझ्या नजरेपुढें सर्वसामान्य बहुसंख्य विद्यार्थी आहेत. जसे कांहीं विद्यार्थी विज्ञान किंवा तत्त्वज्ञान यांना वाहून घेणारे निघतात, त्याचप्रमाणें इतर कांहीं विद्यार्थी भाषेवर प्रभुत्व संपादन करण्याच्या किंवा त्या भाषेंत साहित्यविषयक कामगिरी करण्याच्या हेतूनें भाषांचा अभ्यास करणारे निघतीलच.

(६) माध्यमिक (Secondary) शाळांच्या अभ्यासक्रमांत आरंभीं हिंदीचा समावेश व्हावा, नंतर इतर भाषा ठेवाव्यात.

---

## डॉ. आल्बर्ट आइन्स्टीन

आधुनिक काळचे श्रेष्ठ शास्त्रज्ञ आणि एक श्रेष्ठ मानवतावादी डॉ. आल्बर्ट आइन्स्टीन १८-४-५५ रोजीं निधन पावले. श्री. जवाहरलाल नेहरू यांनीं म्हटल्याप्रमाणें, ते महान् सत्यसंशोधक असून, त्यांनीं असत्याशीं किंवा असत्प्रवृत्तीशीं कधींहि तडजोड केली नाहीं. आज जगावर काळ्या सावल्या पडत असून अंधार माजत आहे. परिस्थिति बिकट होत असून लोकांचा धीर सुटत चालला आहे. अशा समयीं डॉ आइन्स्टीन "यांनीं सतत प्रकाश व धैर्य प्रदान करण्याचें कार्य केलें."

'माझी जीवननिष्ठा' ('I believe') या शीर्षकाखालीं कांहीं वर्षांपूर्वी डॉ. आइन्स्टीन यांनीं आपले कांहीं विचार मांडले आहेत. त्यांतले कांहीं दिले आहेत :

"माझें बाह्य व आंतरिक जीवन बनण्यास माझ्या बांधवांचे कितीतरी श्रम कारणीभूत झाले आहेत, त्या ऋणांतून उतराई होण्याची आपण पराकाष्ठा केली पाहिजे याची जाणीव मला दिवसांतून कितीतरी वेळां होत असते. या ऋणाच्या ओझ्याच्या भावनेमुळें, मी बऱ्याच वेळां अस्वस्थ होतों....

तात्त्विक दृष्ट्या माणुस खरोखरीं स्वतंत्र आहे कीं नाहीं याची वानवाच आहे. केवळ बाह्य दडपणामुळेंच नव्हे तर आंतरिक दडपणामुळेंहि आपण कृति करीत असतो. "ज्याची जशी जशी इच्छा असेल तसें त्याला करतां येईल; पण इच्छा कोणती करावयाची हें मात्र ठरवितां येणार नाहीं" ही शोपेनहावरची उक्ति माझ्या मनांत खोल ठसून गेली आहे. त्यामुळें जीवनांतील हालअपेष्टा पहातांना वा अनुभवतांना मला मोठा धीर वाटला आहे. आपणांस इच्छास्वातंत्र्य नाहीं या जाणीवेमुळें आपल्या स्वतःच्या व इतरांच्या कृतींकडे आपल्याला सहिष्णुतेनें व गंमतीनें बघतां येतें.

"लोकसत्ता हें माझें राजकीय ध्येय आहे. प्रत्येकाला व्यक्ति म्हणून संमान मिळावा पण देव्हारे मात्र कोणाचेहि माजविले जाऊं नयेत. परंतु माझ्या स्वतःवरच जेव्हां अवास्तव प्रशंसास्तुतीचा वर्षाव झालेला मी पहातों, तेव्हां दैवाचा हा उपरोध बघून मला गंमत वाटते. कदाचित्, लोक माझी जी ही अवास्तव स्तुति करतात तिच्यामागें त्यांची स्वतःचीच अतृप्त ज्ञानलालसा असेल.

"सृष्टींतील भूतमात्रांवर निग्रहानुग्रह करणारा कोणी परमेश्वर आहे याची मी कल्पनाहि करूं शकत नाहीं. अशा परमेश्वराची कल्पना म्हणजे आपल्या मानवी अपूर्णतेचेंच प्रतिबिंब होय. मृत्यूनंतर जीवात्मा मागें शिल्लक रहातो, यावर माझा विश्वास नाहीं. कांहीं दुबळे लोक भीतीमुळें किंवा फाजील अहंकारामुळें तसें मानतात. अनाद्यनंत चैतन्यमय जीवन कसें सारखें सळसळत आहे हें लक्षपूर्वक पहाणें, विश्वाची विराट् रचना – जी कोठें अंधुकपणें आपणांस प्रतीत होत आहे – तिचा वेध घेणें, निसर्गांत व्यक्त होणाऱ्या बुद्धितत्त्वाचें परमाणूएवढें ज्ञान मिळालें तरी तें करून घेण्याचा प्रयत्न करणें यांतच मला समाधान आहे.

"...जीवनाच्या या धकाधकींत खरोखरीं मोलाचें, जतन करून ठेवण्यासारखें जर कांहीं असेल तर तें माणसाचें सर्जनशील, संवेदनक्षम व्यक्तित्व होय. जड, निर्मितिशून्य विचाराच्या अज्ञ सामान्य समाजांतून जर कोणती अत्यंत दुष्ट निर्मिति होत असेल तर ती लष्करभरतीची. ...युद्ध म्हणजे माणसाच्या क्षुद्रपणाची पराकाष्ठा होय. या तिरस्करणीय युद्धांत सामील होण्यापेक्षां सहस्रधा विदीर्ण होऊन गेलेलें बरें!

श्री. त्र्यं. सी. कारखानीस

# तगादा !

[ प्रस्तुत 'तगादा' या कवितेचे लेखक श्री. त्र्यं. सी. कारखानीस हे 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चे संस्थापक व चालक, 'राजाचें बंड' व 'स्वैरिणी' या नाटकांचे कर्ते आणि नाटयव्यासंगी लेखक म्हणून महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. प्रस्तुत 'तगादा' ही कविता श्री. कारखानीस यांनीं १९ मार्च १९११ रोजीं 'तुतारी–मंडळा'पुढें वाचून दाखविली. केशवसुतांच्या 'तुतारी' पासून स्फूर्ति घेऊन २१ जानेवारी १९११ रोजीं आपल्या 'महाराष्ट्र नाटकमंडळी'च्या पुण्याच्या मुक्कामातच श्री. कारखानीस यांनीं 'तुतारीमंडळ' काढलें होतें. या 'तुतारी–मंडळा'चे सदस्य व या कवितेचे श्रोते गोविन्दाग्रज, बालकवि इत्यादि पुढें प्रथितयश झालेली मंडळी होती. — या 'तुतारी-मंडळा'विषयीं माहिती पूर्वीं 'नवभारता'च्या जानेवारी १९५१ च्या अंकांत "केशवसुतांच्या 'तुतारी'चे पडसाद" या लेखांत आली आहे.

श्री. त्र्यं. सी. कारखानीस यांच्या वयाला गेल्या १५ एप्रिल १९५५ रोजीं ८१ वर्ष पूर्ण होऊन ८२ वें वर्ष लागलें. त्या निमित्तानें त्यांना दीर्घ आयुरारोग्य चिंतून, त्यांच्या अप्रकाशित साहित्यापैकीं प्रस्तुत 'तगादा' ही कविता व त्यांचेच 'समानधर्मी' नाट्यव्यासंगी श्री. के. नारायण काळे यांचा त्यांच्यावरील लेख प्रसिद्ध करण्यास आनंद होत आहे. — का. सं. ]

नको तगादा–काय बुवा हा 'तुतारी'चा यांच्या त्रास
'आली पाळी. पुरा वायदा करा' शिपाई पाठीस
'आला हा रविवार' म्हणे
'द्या द्या द्या आमुचें देणें
बसलों हें धरुनी धरणें'
कोठेंही जा, जागा झोंपा, दत्त सदा हटकायास
नको तगादा! काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ १ ॥

काय तुमच्या बापाचें हो लागत मी चव्वल चार
कर्जदार मी कसा तुमचा? उगाच करितां बेजार?
'तुतारि' चा हा डांगोरा
तर मग आतां बंद करा
अब्रुदार मी खरा खरा
अब्रू माझी घ्याया ऐशी लाज न तुमच्या हृदयास?
नको तगादा! काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ २ ॥

मागिल जन्मींचे हे वैरी झाले दावा उगवाया.
काय बोलतां? 'हो हो!' म्हणता? चेष्टा करता!
या पाहुं या!
तोंड पुन्हा मजला देतां?
'आलो हे!' उलटुनि म्हणतां?
सांभाळा! उसळेन आतां.
चला चालते! देतो रट्टे! लगावतो दों ठोशास!
नको तगादा–काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ ३ ॥

काय करूं, हे लोंचट बेटे हलति न
धरणें सोडुनिया
लागत नसतां कांहीं यांचें सतावती मज हे वाया
असें बोलतो वरुनि जरी
साक्ष उलट आंतून परी
फंद-फितुर माझ्याच घरीं
कडयाळ अंगावरी येतसे, काय करूं वारायास?
नको तगादा–काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ ४ ॥

जा बे जा! लवंडीच्या भेद्या!
कोण मानतो तुला खरा
घरांत राहुनि उलट घरावर असा सदा तूं फिरणारा.
म्हणुनि सांगतो, ऐक जरा
विचार कर तूं पुरा पुरा
अंतरिंचा मजकूर खरा
याद राख बोलशील तर मग आंतच गाडिन तुज
खास
नको तगादा–काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ ५ ॥

अरे! अरे! परि उठला भेद्या,
चालला किं हा बाहेर!
धमकी माझी सहज झुगारी!
आतां काय मी करणार!
'अरे! अरे!' परि वळेचिना!
'थांब थांब' छे, ठरेचिना!
'सुन सुन बेटा' सुनेचिना!








काय बरें हे! जाशी माझ्या उलट साक्ष कां द्यायास?
नको तगादा–काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ ६ ॥
जा शिंच्या तूं असाच उलटा!
कधीं न तूं ऐकायाचा
उलटें जाणें, गप्प न रहाणें अशाच तूं अवलादीचा!
दे मग आतां साक्ष पुरी
सांग कोठलें कर्ज तरी
असति कोण हे रीणकरी
'तुतारि'नें फुंकिती तगादा घरे पाडिले कानास
नको तगादा–काय बुवा हा
'तुतारि'चा यांच्या त्रास ॥ ७ ॥
पहा काय दिवटा हा आता दिवा पाजळी साक्षीचा
जसा कांहिं अंधार पसरला, उजेड याच्या अकलेचा!
म्हणे " कर्ज हें फार जुनें
विसरलास तूं झोंपेनें
यांच्याच दिलें तें बापानें
बाप न परि यांचाच, तुझाही खूणगांठ घे हृदयास"
अरे तगादा नको बुवा हा!–
काय पहा यांचा त्रास ॥ ८ ॥
" बाप न केवळ मायबाप तो
तुझाहि त्यांचा सकलांचा
वत्सलहृदयी खरा परी तो साऊकार बा जातीचा
हौस त्यास व्यापाराची
भागविण्याला ती मनिंची
पेठ उघडिली जगताची
बेपारी लेंकरेंच केलीं दिलें भांडवल मग त्यास–"
" जरा तगादा पुरे करा रे
ऐकू दे या साक्षीस " ॥ ९ ॥
"दिलें भांडवल याच अटीवर वाढ करा अनवरतेनें
अणुरेणूही काळ दवडिला वाढीवांचुनि हें नेणे
काळाच्या अणुचें हृदया
भासें जें आकाश तया
चक्रचि केलें मापाया
चक्रवाढिनें भांडवलावर धरी व्याज तो व्याजास"
"जरा तगादा पुरे करा रे ऐकूं द्या या साक्षीस ॥१०॥
"वाढ करावी, व्याज भरावें; एक धरावें ध्यान परी
जबर भांडवल असे उरावर करणें त्याची फेड पुरी
ध्यान सदा जो हेंच धरी
झटापटीने पुरे करी
जाय तोच बा परत घरीं
वत्सलहृदयी साऊकार तो कुरवाळी मग हृदयास"
"जरा तगादा पुरे करारे ऐकूं द्या या साक्षीस" ॥११॥
" बापाचें ऋण केव्हांचें तें ओळख मूढा, अतां तरी
अणुचक्रें काळाचीं त्यावर कितीक फिरली आजवरी
व्याज तयाचें किती तरी!
डोंगर झाले अणूवरी!
दाद तुला त्याची न परी
ख्यालिखुशालीं काळ दवडिशी खुशाल जासी झोंपेस"
" काय तगादा बुवा असा हा–
'तुतारि'चा नसता त्रास!" ॥१२॥
"घोर झोंप तुजलाही लागे स्वप्नचि वाटे तुज सारें
भांडवलाची ठेव गडपिली–नव्हतिच वाटे तुला खरें
झोंप तुझी ही उडवाया
कान तुझे ते फुंकाया
ठेवीवर दृष्टी द्याया
केशवसुत फुंकितो 'तुतारी' शिपाइ हा त्या बापाचा"
"उठतोरे बुवा, कुठला आला, त्रास काय पण हा
याचा" ॥१३॥
"नाहीं नाहीं गेली गुंगी अजुनि तुझी त्या झोपेची
प्राणरवानें जरि 'कृष्णा'नें फुंक मारिली 'तुतारि'ची
आले त्याचे हे बेटे
पुन्हा उठविण्या उफराटे
तुलाच देतिल हे रट्टे
ऊठ ऊठ तर करी वायदा पुरा. न अवसर वेळ भरे"
"उठतोरे बुवा, कबूल करतो.
आतां तगादा पुरे पुरे ॥१४॥

---



अनुक्रमणिका







श्री. के. नारायण काळे

# माझ्या माहितीचे अण्णा कारखानीस

## चाळीस वर्षांपूर्वी

जवळजवळ चाळीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. मी तेव्हां दापोलीच्या इंग्रजी शाळेंत शिकत होतों. ती शाळा मिशनची होती. पण त्यापूर्वी सुमारें वीस वर्षे कोंकणांतील त्या लहानशा गांवांत शिक्षणक्षेत्रांतील एक नवीन आणि धाडसी प्रयोग करण्याचा प्रयत्न झाला होता. चिपळूणकर, टिळक, आगरकर यांनीं राष्ट्रीय शिक्षणाचें जें कार्य पुण्यांत सुरूं केलें, त्याचे पडसाद कोंकणच्या कानाकोपऱ्यांतून उमटविण्याची ईर्षा तेथील कांहीं तरुण मंडळींच्या मनांत उत्पन्न झाली. श्री. नारायणराव गोगटे हे त्या चळवळीचे अध्वर्यु होते, आणि त्यांनीं आपल्या भोंवती जी उत्साही आणि ध्येयवादी मंडळी जमविली होती त्यामध्यें श्री. त्र्यंबक सीताराम कारखानीस हे एक होते. श्री. गोगटे यांची राष्ट्रीय शाळा पुढें सरकारी रोषास बळी पडली. श्री. कारखानीस दापोली सोडून पुण्यास गेले.

मी शाळेंत दाखल झालों तेव्हां या साऱ्या गोष्टी स्मृतिशेष झाल्या होत्या. परंतु दापोलीसारख्या त्या लहानश्या गांवीं असल्या संस्मरणीय घटनेच्या आठवणी इतक्या लौकर पूर्णपणें बुजून जाणें शक्य नव्हतें. आम्हां विद्यार्थ्यांच्या कानीं त्या वारंवार पडत. श्री. कारखानीस यांचें नांव त्यांत अधिक वारंवार आणि विशेष आदरानें उच्चारिलेलें ऐकूं येई. मिशन स्कूलमधील आम्हां विद्यार्थ्यांचे आवडते शिक्षक, श्री. कृ. पां. लिमये –' कवि राधारमण' हे श्री. कारखानिसांबद्दल अतिशय गौरवानें बोलत. महाराष्ट्र-नाटक-मंडळीचें ब्रीदवाक्य, "Not failure but low aim is crime" ही लोवेल कवीची पद्यपंक्ति, श्री. कारखानीस यांच्या सांगण्यावरून, ' नोच्चार्थो विफलोऽपि दूषणपदं दूष्यस्तु कामो लघुः ' ह्या स्वरूपांत आपणच त्यांना अनुवादित करून दिली, असें त्यांच्या तोंडून आम्ही ऐकिलें होतें. एका वेळीं शिक्षक असलेला एक सुशिक्षित मनुष्य नाटकमंडळींत जातो, नटाचा व्यवसाय करून प्रतिष्ठा मिळवितो हें ऐकत असतांना आम्हांला अतिशय आनंद होई; आणि दर आठवड्याला 'केसरीं'-त येणाऱ्या, ' व्यवस्थापकः त्र्यं. सी. कारखानीस ' या सहीच्या महाराष्ट्र नाटकमंडळीच्या तीन ओळीच्या जाहिरातीवरून तिचा मुक्काम कोठें आहे हें समजून घेण्याकडे माझें नेहमीं लक्ष असे.

श्री. कारखानीस यांच्याशीं प्रत्यक्ष परिचय होण्याचा योग मात्र त्यानंतर पुष्कळच वर्षांनीं मला आला. ' सरलादेवी ' नाटकाचे कर्ते श्री. वासुदेवराव भोळे हे त्याला कारणीभूत झाले. श्री. भोळे हे श्री. कारखानिसांचे निकटचे स्नेही आणि निष्ठावंत चाहाते आहेत. श्री. कारखानीस हे एक अनन्यसाधारण नाट्यशिक्षक आणि नियोजक आहेत, अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे. माझा व श्री. भोळे यांचा मुंबई येथें परिचय झाल्यावर माझी नाट्यविषयक अभिरुचि पाहून त्यांनीं श्री. कारखानीस यांच्याशीं माझा परिचय करून देण्याचें ठरविलें. मी त्यांच्याबरोबर पुण्याला आलों.

घ. नं. २८१, शनिवार हें श्री. कारखानीस यांचें पुणें येथील निवासस्थान आहे. ओंकारेश्वराजवळील एका बोळांत हें घर आहे. श्री. अण्णासाहेब किर्लोस्कर पूर्वी कधीं त्या घरांत राहात होते व त्या बोळांतील दुसऱ्या एका वाड्यांत श्री. गो. ग. आगरकरांचें बिऱ्हाड होतें, असें त्या घराचें व त्या बोळाचें स्थानमाहात्म्य ऐकिवांत आहे. श्री. वासुदेवराव भोळयांच्या ओळखीच्या शिफारशीमुळें श्री. कारखानीस प्रथमपासूनच माझ्याशीं अत्यंत मनमोकळेपणानें व आपुलकीनें वागले. औपचारिकपणाचा त्यांत संपर्कहि नव्हता. मीं त्या वेळीं बी. ए. च्या वर्गांत होतों. त्यांच्या माझ्या वयांत पुरेपूर तीस वर्षांचें अंतर होतें. पण त्यांनीं तें वागणुकींत किंवा विचारविनिमयांत मला भासूं दिलें नाहीं. तात्विक चर्चेची त्यांना मनापासून आवड आहे याचें मला ह्या पहिल्या भेटींतच प्रत्यंतर मिळालें व त्याबरोबरच त्यांचा प्रेमळ स्वभाव व आतिथ्यशील वृत्ति यांचीहि साक्ष पटली.

## नट, नाट्यशिक्षक-संचालक, मार्गदर्शक

श्री. कारखानीस यांच्याशीं माझा परिचय झाला, त्यावेळीं ते नाट्यव्यवसायांतून निवृत्त झाल्याला पांचसहा वर्षे होऊन गेलीं होतीं. स्वाभाविकच सर्वसाधारण नाट्यरसिकांच्या स्मरणांतून ते कांहींसे लुप्त होऊं लागले








होते. कलाक्षेत्रांतील व्यक्तींची बहुशः ' दृष्टीआड सृष्टीआड ' अशी स्थिति असते. एखादीच अपवादात्मक व्यक्ति अशी असते कीं, जिच्या आठवणी मागें राहिलेल्या असतात, तिच्याबद्दल दंतकथा उत्पन्न झालेल्या असतात. अण्णासाहेब किर्लोस्कर, भाऊराव कोल्हटकर, गोविंदराव देवल, गणपतराव जोशी, गणपतराव भागवत, बाळाभाऊ जोग या अशा प्रकारच्या व्यक्ती होत. श्री. त्र्यं सी. कारखानीस यांचीहि कांहींशी अशीच स्थिति आहे. रंगभूमीशीं त्यांचा फारसा दीर्घकालीन संबंध होता असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. इ. स. १९०४ ते १९२० च्या दरम्यानचीं सुमारें १५–१६ वर्षें हाच त्यांच्या सक्रिय नाट्यसेवेचा काल होय. या अवधींत नट, नाट्यशिक्षक, व्यवस्थापक, संचालक, नाटककारांचे मार्गदर्शक अशा वेगवेगळया नात्यांनीं त्यांनीं नाट्याच्या क्षेत्रांत कार्य केलें; व त्यांपैकीं आपली प्रत्येक भूमिका अत्यंत यशस्वीरीतीनें पार पाडली. जें जें हातीं घेतलें त्यावर आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटवून तें त्यांनीं लोकांपुढें मांडलें. परंतु एकंदरींत, निर्मिति आणि सर्जन यांपेक्षां पद्धतशीरपणा, शिस्त, संघटना, तंत्र आणि सुव्यवस्था या अंगांतील त्यांचें वैशिष्ट्य आणि व्यक्तिमत्त्व लोकांच्या लक्षांत अधिक प्रमाणांत राहिलें व त्याबद्दलच त्यांच्याकडून त्यांचा वेळोवेळीं गौरव झाला.

## आंतरिक निष्ठेचे नाट्यसेवक

श्री. कारखानीस यांच्या प्रत्यक्ष नाट्यसेवेचा काल अल्प असला तरी त्या कालांतील त्यांच्या कार्याचा दर्जा आणि महत्त्व हीं फार मोठीं आहेत. मराठी नाट्यकलेच्या आणि नाट्यव्यवसायाच्या इतिहासांत श्री. कारखानीस यांना स्वतंत्र आणि मानाचें स्थान आहे. त्यांच्या विरोधकांना व आक्षेपकांनाहि हें नाकारतां येणें कठीण आहे. श्री. कारखानीस यांचे गुणावगुण व त्यांचें कार्य याबाबत त्यांचे चाहते आणि आक्षेपक यांमध्यें जितके तीव्र मतभेद दिसून येतात तितके नाट्यक्षेत्रांतील त्यांच्या बरोबरीच्या दुसऱ्या कोणाहि व्यक्तीबद्दल क्वचितच आढळून येत असतील. ' मी कसा झालों ? ' ह्या आपल्या आत्मचरित्रात्मक प्रबंधांत श्री. प्र. के. अत्रे यांनीं श्री. कारखानीस यांच्याबद्दल अत्यंत अनुदार उद्गार काढले आहेत. ते प्रत्यक्ष परिचयाच्या अभावीं गैरसमजावर आधारलेले आहेत, हें उघड आहे. श्री. अत्रे यांचे ते उद्गार एका बाजूला आणि श्री. वासुदेवराव भोळे यांनीं श्री. कारखानीस यांच्याबद्दल वेळोवेळीं जें लिहिलें आहे, तें दुसऱ्या बाजूला ठेवलें आणि त्यांतील विधानांची तुलना केली, तर असें दिसून येईल कीं एक त्यांची ज्याबद्दल मुक्तकंठानें स्तुति करतो, नेमकी त्याचबद्दल दुसरा त्यांची निरर्गल निंदा करतो ! श्री. अत्रे व भोळे यांच्यापुरताच हा विरोध मर्यादित नाहीं. श्री. पु. रा. लेले, श्री. य. ना. टिपणीस यांसारखे श्री. कारखानीस यांचे आक्षेपक व श्री. श्री. वि. वर्तक, सौ. मुक्ताबाई दीक्षित, प्रा. लागू इत्यादि त्यांचे चाहते यांचे त्यांच्याबद्दलचे उद्गार वाचले तर हाच आत्यंतिक विरोध त्यांतही दिसून येईल. त्या दोहोंमधील व्यक्तिगत अनुकूल-प्रतिकूलतेचा अतिरंजित भाग काढून टाकला तर एक गोष्ट स्पष्ट होते. ती ही कीं, श्री. कारखानीस हे नाट्यकला व नाट्यव्यवसाय यांबद्दल निश्चित स्वरूपाची आंतरिक निष्ठा बाळगणारे निरलस नाट्यसेवक असून त्यांचीं कांहीं अपरिवर्तनीय मूल्यें आहेत. त्यांच्याबद्दल जे कांहीं बरे-वाईट समज-गैरसमज आहेत, ते त्यांचीं तीं मूल्यें मान्य वा अमान्य असल्यामुळें, किंवा तीं मूल्यें अमलांत आणण्याची त्यांची जी पद्धति आहे ती पसंत वा नापसंत असल्यामुळें, उत्पन्न झालेले आहेत. त्यांची तत्त्वनिष्ठा, सौजन्य व सचोटी यांबद्दल त्यांच्या विरोधकांनींहि त्यांच्या विरुद्ध आक्षेप घेतल्याचें ऐकिवांत नाहीं. रूक्षपणा, यांत्रिकता, दुराग्रह, व्यावहारिक राजकारण यांबद्दल त्यांच्यावर अनेक लोक रुष्ट आहेत. पण त्यांची निष्ठा, चिकाटी, शिस्त आणि पद्धतशीरपणा यांबद्दल त्यांची सर्वत्र प्रशंसाच ऐकूं येते. त्यांचा व माझा परिचय त्यांच्या व्यवसायनिवृत्तीनंतर झालेला असल्यामुळें, या संबंधांत प्रत्यक्ष पुराव्यानें वा अनुभवानें मत बनविण्यास मला कांहींच साधन नाहीं. माझी माहिती ऐकीव स्वरूपाची आहे. आणि माझीं मतें तिच्यावर आधारलेल्या अनुमानांनीं बनलेलीं आहेत.

श्री. कारखानीस यांनीं जवळजवळ वीस वर्षें नाट्यव्यवसाय केला. त्यांत कीर्ति मिळविली. आपल्या व्यक्तित्वाचा ठसा त्याच्यावर उमटवून ठेवला. त्याला सामाजिक प्रतिष्ठा व आशय प्राप्त करून दिला. गद्य रंगभूमीची स्वतःची अशी स्वतंत्र परंपरा निर्माण केली.








जोडोनिया धन उत्तम वेव्हारें, उदास विचार वेंच करी ' या दण्डकानुसार व्यवसायांतून निवृत्त होतांना त्यांनीं आपली प्रापंचिक योजनाहि आंखली होती. हातां-तोंडाशीं आलेल्या मुलाच्या मृत्यूमुळें त्यांच्या मनाला आणि योजनांना एक फार मोठा धक्का बसला. ही दुर्दैवी घटना सोडली तर एरवीं त्यांचा संसार सुव्यवस्थित व सुखासमाधानाचा आहे. त्यांच्या पत्नींचा स्वभाव अत्यंत शांत आणि प्रेमळ असून त्या एक आदर्श महिला, माता, गृहिणी आणि सहचारिणी आहेत त्यांचे चिरंजीव डॉक्टर असून सर्व कन्याहि सुविद्य आणि पदवीधर आहेत. श्री. कारखानीस व त्यांची कुटुंबीय मंडळी आतिथ्यशील आणि प्रेमळ असल्यामुळें त्यांचे स्नेही व नातलग त्यांच्या पाहुणचाराचा वारंवार लाभ घेत असतात.

## ज्ञानाचीं क्षितिजें विस्तृत करण्याचें ध्येय

तसें पाहिलें तर ते कांहींसे अकालींच व्यवसायनिवृत्त झाले. पण नाटयव्यवसायांत त्यांना करितां येण्यासारखी होती तितकी प्रगति त्यांनीं केली होती आणि तेवढयावर त्यांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. ज्ञानार्जनाची तळमळ आणि प्रगतीची ओढ हा त्यांचा प्रकृतिधर्म आहे. अध्ययन-अध्यापनाची आवड त्यांच्या ठिकाणीं स्वाभाविक आहे. त्यांनीं कोणताहि व्यवसाय केला असता तरी तो त्यांत प्रकट झाल्यावांचून राहाणें शक्य नव्हतें. नट आणि नाट्यनियोजक म्हणून ते लोकांपुढें वावरत असले तरी त्यांचा पिंड शिक्षकाचा होता. आणि नाटयव्यवसायांत त्यांनीं जें यश व कीर्ति मिळविली, त्यांना कारणीभूत झालेले गुण त्यांच्या या प्रकृतिधर्माचेच द्योतक होते. घरगुती परिस्थितीमुळें तरुणपणीं त्यांना पदवी घेण्यापूर्वींच नाकरी पत्करावी लागली; आणि पुढें व्यावसायिक जबाबदाऱ्यांमुळें उत्कट इच्छा असतांहि कोणत्याहि विषयाचें शास्त्रशुद्ध अध्ययन आणि मनन करण्याला आवश्यक असलेलें स्वास्थ्य त्यांना लाभूं शकलें नाहीं. म्हणून नाटयव्यवसायांतून निवृत्त झाल्यावर स्वतःचें अपुरें राहिलेलें शिक्षण पुरें करण्याचें आणि आपल्या ज्ञानाचीं क्षितिजें विस्तृत करण्याचें ध्येय त्यांनीं आपल्यापुढें ठेवलें होतें.

माणसाला, ' फार चातुर्य ' येण्यासाठीं ज्या गोष्टी आवश्यक आहेत, असें सुभाषितकारानें म्हटलें आहे त्यांपकीं ' सभेंत संचार ' करण्याची श्री. कारखानीस यांना फारशी गोडी नाहीं. व्यवसायानिमित्त त्यांचें ' देशाटन ' भरपूर झालें आहे. ' पंडितमैत्री'चाहि त्यांना हव्यास आहे आणि ' शास्त्रग्रंथविलोकन ' हें तर त्यांचें व्यसनच आहे. कविता, लेख, गोष्टी, निबंध इत्यादि स्फुट लेखनहि त्यांनीं थोडेंफार केलें आहे. निवृत्तीनंतरच्या कालांत त्यांच्या दोन प्रदीर्घ कथा मी संपादक असतांना ' रत्नाकर ' व ' साहित्यपत्रिका ' यांमधून प्रसिद्ध झालेल्या आढळतील. ' राजाचें बंड' व ' स्वैरिणी ' ही त्यांचीं दोन स्वतंत्र नाटकें प्रसिद्ध आहेत. याशिवाय इब्सन आणि शॉ यांच्या कांहीं नाटकांचे त्यांनीं केलेले अनुवाद हस्तलिखित स्वरूपांत आहेत. रंगभूमीचा प्रत्यक्ष अनुभव व नाट्यविषयक उपपत्तीवर प्रभुत्व असूनहि त्यांचीं नाटकें प्रयोगानुकूल स्वरूप पाहूं शकलीं नाहींत. त्याचें कारण त्यांतील वस्तुतः प्रभावी असलेलें नाट्यतत्त्व त्यांच्या तात्त्विक उपपत्तींच्या भाराखालीं दडपून जाऊन दुर्बल आणि लुप्त होतें हें आहे. त्यांचे संवाद नाटकांतील पात्रांमधील सहजस्फूर्त संभाषणें होण्याऐवजीं त्यांना तार्किक चर्चांचें किंवा विदग्ध वाङ्मयाचें स्वरूप येतें. त्यांतील वास्तवता आणि प्रसाद नाहींशीं होतात. श्री. कारखानीस यांची मनोरचना एकमार्गी आहे त्यांच्या निष्ठा व त्यांचीं मूल्यें यांच्याशीं समरस व सहमत न होणाऱ्या व्यक्तींची भूमिका ते सहानुभूतीनें समजूं शकत नाहींत. बुद्धिपुरस्सर तसा प्रयत्न करण्याची आवश्यकताहि बहुशः त्यांना कधीं पटली नसावी. स्वाभाविकच स्वतःहून वेगळया प्रकृतिधर्मांच्या व्यक्तींशीं त्यांचें सहकार्य होऊं शकत नाहीं. या त्यांच्या विशिष्ट स्वभावगुणामुळेंच ' महाराष्ट्र नाटक-मंडळी'ला ते स्वतंत्र असें व्यक्तित्व आणूं शकले नाहींत आणि त्याचमुळें ' महाराष्ट्र नाटकमंडळी ' सांचेबंद बनली.

श्री. कारखानीस व्यवसायनिवृत्त झाल्याला आतां जवळजवळ तीन तपें पुरीं व्हावयाला आलीं. या कालांत त्यांनीं आपल्या संकल्पाप्रमाणें अनेक ग्रंथांचें वाचन केलें. अनेक विषयांचा अभ्यास केला. आपल्या ज्ञानाचीं क्षितिजें विस्तृत केलीं. पण हें करीत असतांना सार्वजनिक जीवनापासूनचा आपला संबंध ते कायम टिकवूं शकले नाहींत. ते केवळ नाटयव्यवसायांतूनच निवृत्त झाले नाहींत, तर एखाद्या वानप्रस्थाप्रमाणें










सर्व प्रकारच्या क्रियाशील व्यापारांपासूनच ते परावृत्त झाले. त्यांचा स्वभाव मूळचा अंतर्मुख व स्वयंकेंद्रित. पण व्यवसायामुळें त्यांना अनेकांशीं संबंध ठेवणें भाग व पडे. निवृत्तीनंतर तीहि आवश्यकता उरली नाहीं. कोणी घरीं आलें तर त्याच्याशीं बोलावें, तात्त्विक चर्चा करावी, वादविवाद करावे, क्वचित् एकाद्या निकटच्या स्नेह्याच्या घरीं जावें. पण एकदरींत त्यांची मित्रमंडळी त्यांच्याकडे येण्याचा शिरस्ता अधिक; असा त्यांचा जीवनक्रम असे. सार्वजनिक ठिकाणीं ते क्वचितच दिसत. वाचनाच्या नादामुळें श्री. विठ्ठलराव दीक्षित यांच्या इंटरनॅशनल बुक् सर्व्हिसमध्यें मात्र त्यांची नेहमी फेरी असे.

### छाप पाडणारें व्यक्तित्व

श्री. कारखानीस स्वभावतः माणसघाणे नाहींत. किंबहुना, माणसांच्या सहवासाची त्यांना अतोनात आवड आहे. परंतु प्रथमदर्शनीं नवपरिचिताला एक प्रकारचा दबदबा आणि धाक वाटावा अशीच कांहींशीं त्यांची मुद्रा आणि भाषणपद्धति आहे. अनेक वर्षें एकट्याच्या जबाबदारीवर एका नाट्य-संस्थेचें संचालन करावें लागल्यामुळें, भावनिदर्शन न होईल अशी मुखवटेवजा मुखचर्या आणि मोजके, वेंचक, औपचारिक शब्द वापरून सावधपणें बोलण्याची शैली त्यांनीं कमाविली आहे. त्यांचा चेहरा उग्र नसला तरी गंभीर आणि अधृष्यतासूचक आहे. दृष्टि समोरच्या माणसाला अस्वस्थ करणारी आणि भेदक आहे. मोठें बांकदार नाक, फारशी मोठी नसली तरी ठळक आणि कातीव अशी गोल हनुवटी, छोटीशी पण निश्चय-निदर्शक ठसठशीत जिवणी, तिला उठाव देणाऱ्या भरदार पण कोरीव मिशा, मध्यम जाडीच्या, कमानदार आणि बोलतांना सहजपणें वरखाली होणाऱ्या, आकुंचन-प्रसरण पावणाऱ्या रेखीव भिवया, उंच आणि रुंद कपाळ, मानेवर रुळण्याइतके लांब कापलेले आणि मान व मस्तक यांना ऐटदार झटका मिळतांच सिंहाच्या आयाळीप्रमाणें हालणारे दाट केस, आवेशयुक्त आणि गतिमान् अंगविक्षेप, भाषणांतील मुद्द्याच्या समर्थनार्थ ठेक्यांत आणि ठस-क्यांत होणारे हस्तव्यापार, सुस्पष्ट आणि घोटीव शब्दो-च्चार, आंदोलनयुक्त, किंचित् सानुनासिक असा घोषित स्वर, स्थूल आरोहावरोहांना अनुकूल परंतु फारसा मृदु आणि लवचिक नसलेला खणखणीत, रूक्ष आणि ठाशीव आवाज—इत्यादि त्यांच्या शारीरिक व वाचिक वैशिष्ट्यांमुळें समोरील माणसावर त्यांची तावडतोब छाप पडते आणि तो त्यांच्याशीं कांहींशा संकोचानें आणि सावधपणानेंच वागावें असें ठरवितो. पण त्यांचा उग्रपणा हें एक परिस्थितीनें निर्माण झालेलें संरक्षक कवच आहे. जसजसा परिचय वाढत जातो तसतसें तें आपोआप हळूहळू गळूं लागतें. आणि त्यांच्या खऱ्या स्वभावाची ओळख नवपरिचिताला पटूं लागते. विशिष्ट निश्चित हेतु मनांत बाळगून पद्धतशीर रीतीनें त्यांच्या अनुभवांचा, विचारांचा, ज्ञानाचा आणि मार्गदर्शनाचा लाभ मिळविण्याचा प्रयत्न कोणी केला तर ते त्याला मनापासून साहाय्य आणि उत्तेजन देतात. पुण्यांतील कलोपासक-मंडळाच्या कांहीं सद-स्यांनीं 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' या पद्धतीनें त्यांच्या सहवासाचा चांगला उपयोग करून घेतला असावा, असें वाटतें. पण त्यापलीकडे जाऊन अधिक क्रियाशील असें कांहीं साहाय्य किंवा मार्गदर्शन श्री. कारखानीस यांच्याकडून त्यांना मिळालेलें मात्र दिसत नाहीं.

### आत्यंतिक आधुनिकता व पारंपरिक कर्मठपणा

तीन तपाच्या या व्यवसायनिवृत्तीनंतरच्या काळांत त्यांच्या चहात्यांच्या अपेक्षा-आकांक्षा कितपत सफल झाल्या, हा विचार क्षणभर बाजूला ठेवला आणि त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक विकासाच्या दृष्टीनें या कालांत त्यांनीं अंतर्मुख दृष्टीनें परिश्रमपूर्वक जी ज्ञान-साधना केली, जो ग्रंथसंग्रह व लोकसंग्रह केला तो पाहिला तर त्यांचें तें कार्य स्पृहणीय आणि प्रशंसनीय असेंच आहे. शिक्षकाचा व्यवसाय करीत असतांना ते इतिहास, गणित व इंग्रजी हे विषय शिकवीत. नाट्य-व्यवसायांत असतांना ते अभिनय व वक्तृत्व शिकवीत. हें अध्यापनकार्य करीत असतांना त्यांनीं त्या त्या विषयावरील अनेक ग्रंथांचें वाचन आणि मनन केलें होतें. व्यवसायनिवृत्तीनंतर त्यांचें वाचन आणि चिंतन तात्कालिक उपयुक्ततेच्या कक्षेंत मर्यादित राहिलें नाहीं. तत्त्वज्ञान, राजकारण, साहित्यशास्त्र, पाश्चिमात्य नाट्यवाङ्मय, तद्विषयक तात्विक उपपत्ती, ज्योतिष—यांसारखे अनेक विषय, अगदीं अद्ययावत् ग्रंथांचें आलोडन करून, या कालांत त्यांनीं आत्मसात्








करण्याचा कसून प्रयत्न केला. आचार्य भागवत, आचार्य जावडेकर, सानेगुरुजी, प्रा. लागू यांसारख्या विद्वानांचा आणि विचारवंतांचा स्नेह, सहवास आणि साहचर्य यांचा त्यांनीं त्या कामीं भरपूर उपयोग करून घेतला. या सर्वांचें साहाय्य त्यांना झालें असलें तरी श्री. कारखानीस हे स्वतंत्र विचाराचे, स्वयंप्रज्ञ गृहस्थ आहेत. कोणत्याहि संघटित संप्रदायाच्या चौकटींत ते सामावले जाऊं शकत नाहींत. त्यांची अभ्यासाची पद्धतीहि शास्त्रशुद्धतेपेक्षां भावनात्मकतेवर अधिक भर देणारी आहे. यामुळें यांच्या विचारांत बरेंचसें अराजकहि आढळतें. आत्यंतिक आधुनिकता आणि पारंपरिक कर्मठपणा यांचें कांहीं विचित्र आणि विसंगत संमिश्रण त्यांत आहे. इब्सेन, शॉ, गाल्झवर्दी या नाटककारांच्या नाटकांचा त्यांनीं बारकाईनें अभ्यास केला आहे. व त्यापैकीं पहिल्या दोघांचें तत्त्वज्ञान व नाट्यनैपुण्य याबद्दल त्यांचा स्वतःचा स्वतंत्र असा दृष्टिकोन व उद्बोधक उपपत्तीहि आहेत.

त्यांचा माझा आज जवळजवळ तीस वर्षांचा परिचय आहे. मी व माझे स्नेही कै. श्री. बापूराव आपटे यांनीं महाराष्ट्र नाटकमंडळींत दाखल व्हावें असा एक विचारहि आरंभीं कांहीं काळ वातावरणांत होता. अनेक कारणांनीं तो फलद्रूप होऊं शकला नाहीं. पुढें 'नाट्यमन्वन्तरा'ची स्थापना करण्याचें ठरलें. श्री. कारखानिसांनीं निदान सल्लागार या नात्यानें तरी त्यांत सामील व्हावें असा मींच तेव्हां आग्रह धरला होता. त्याला मान देऊन ते त्या संस्थेच्या कार्यांत भाग घेऊं लागले. दुर्दैवानें 'नाट्यमन्वन्तरा'चा एकंदर कारभार, त्याच्या संस्थापकांचे स्नेहसंबंध अधिक दृढ आणि कार्यक्षम करणारा ठरला नाहीं. त्यांच्यामध्यें त्यामुळें अधिक दूरीभावच निर्माण झाले. या संदर्भांत श्री. कारखानीस यांच्या मनांत माझ्याबद्दलचे बरेचसे गैरसमज निर्माण झाले आहेत, माझ्याविषयींचें त्यांचें मत बरेचसें कलुषित झालें आहे, याची मला जाणीव आहे. हे गैरसमज दूर करून घेण्याची त्यांनीं कधीं इच्छा दर्शविली नाहीं. मीहि कधीं मुद्दाम खुलासा करण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यांचा-माझा हा स्वभावधर्म आहे. त्यांच्या मनांत माझ्याबद्दल कांहींहि समज-गैरसमज असले तरी त्या सर्वांना पुरून उरेल इतकें सौहार्द आणि आत्मीयता आमच्या दोघांच्या संबंधांत आहे. आणि त्यावर कशाचाहि प्रतिकूल परिणाम होणार नाहीं, होतां कामा नये—असा मला विश्वास वाटतो.

## उपेक्षित मानकरी

श्री. कारखानीस यांच्या अकालीन व्यवसायनिवृत्तीचा आणि त्यांच्या एकांतप्रिय वृत्तीचा परिणाम गेल्या दोन पिढ्यांतील रसिक, नाट्यप्रेमी कायकल्याच्या व अभ्यासकांच्या ते दृष्टीआड होण्यांत झाला आहे. श्री. चिंतूबुवा दिवेकरांसारखे त्यांचे समवयस्क नाट्यव्यवसायी जनताभिमुख आणि कार्यक्षम राहिल्यामुळें सर्वांच्या नजरेसमोर आहेत. त्यांच्या रंगभूमीच्या साधारणप्रतीच्या सेवेचें आणि कलेचें रसिकांकडून कौतुक आणि चीज होत आहे. पण श्री. कारखानीस यांचें मराठी नाट्यसृष्टींतील कार्य इतकें मोलाचें आणि महत्त्वाचें असतांहि त्यांचें नांवदखील सर्वसाधारण रसिकच केवळ नव्हे, तर नाट्यसृष्टींत आज जे तज्ज्ञ आणि अधिकारी म्हणून पुढें वावरत आहेत तेहि विसरले असावेत, असें दिल्लीपासून मुंबईपर्यंत पुरस्कार-पारितोषिकांच्या ज्या घटना घडत आहेत त्यावरून अनुमान निघतें. श्री. कारखानीस यांच्या या उपेक्षेला त्यांचे शिष्य आणि चाहते बव्हंशीं जबाबदार असले, तरी थोड्याफार प्रमाणांत स्वतः तेहि अप्रत्यक्षपणें तिला कारणीभूत आहेत. "The fault, dear Brutus, is not in our stars but in ourselves that we are underlings." हें सीझरचें म्हणणें अंशतः त्यांनाहि लागू असण्याचा संभव आहे. पण तें कसेंहि असलें तरी आतां त्यांच्या वयाला एक्यायशीं वर्षें पुरीं झालीं, त्यांची विचारशक्ति आणि कार्यक्षमता, परिसीमित झाली, अशा वेळीं त्यांना कांहींना कांहीं तरी योग्य सत्कार होईल, त्यांच्या कार्याचा यथोचित गौरव केला जाईल, असा प्रयत्न त्यांचे स्नेही आणि चाहते यांच्याकडून होणें आवश्यक आहे. श्री. कारखानीस यांचा स्वभाव पराकाष्ठेचा संकोची, प्रसिद्धिपराङ्मुख व निःस्पृह आहे. त्यांच्याकडून या बाबतींत कांहीं उत्तेजन किंवा साहाय्य मिळणार नाहीं. पण हें गृहीत धरूनच हें कार्य व्हावयाला पाहिजे, व तें शक्य तितक्या लवकरहि व्हावयाला पाहिजे.







श्री. मधुकर जावडेकर

# दिल्लीच्या परिसरांत चार घटका !

जुनी दिल्ली आणि नवी दिल्ली हीं जरी केवळ कालवाचक नांवें असलीं तरी एका निराळयाच अर्थानें तीं मला फार अन्वर्थक वाटतात. विशेषतः देशाच्या राजधानीला हें जुनें-नवेंपण फार शोभून दिसतें. काळ झपाट्यानें धावत असतांना येथील सिंहासनाधिष्ठित राजर्षींनीं आपल्या कर्तृत्वाचा जिरेटोप सांभाळीत आपल्या आणि आपल्या काळाच्या स्मृती जागोजागीं खोदून ठेविल्या आहेत, त्यांचें दर्शन होऊन नवल वाटतें. राजधान्यांची राजधानी असें हें दिल्ली शहर तर या बाबतींत अगदीं अनन्यसाधारण आहे. कदाचित् येथील हवामान वर्षभर एकसारखें सुखद नसेल; येथील बहुसंख्य जनतेंत शिक्षणाचा प्रसार नांव घेण्यासारखा नसेल; येथील स्वच्छास्वच्छतेच्या कल्पना दाक्षिणात्यांना मोठ्या मानवणाऱ्या नसतील कदाचित् ; तरीहि राजधानी म्हणून या शहराची आणि त्यांतील नव्या-जुन्याची एक विशिष्ट संस्कृति मनावर परिणाम केल्याशिवाय रहात नाहीं.

जुन्या दिल्लींतील बहुजनसमाज अजूनहि मोगली ऐसपैसपणांतच लोळत पडलेला दिसतो. अशांति, अस्थैर्य, असमाधान हीं आजच्या समाजजीवनाचीं वैशिष्ट्यें आहेत म्हणे ! पण चांदणीचौकाच्या चतुःसीमेंत पहुडलेल्या तमाम जनतेस त्याची सुतराम् जाणीव नसावी. ही जनता अजूनहि ' धीरे धीरे ' आगेकूच करीत आहे. घाई, गर्दी, धांवाधांव त्यांचें गावींहि नाहीं. किंबहुना, अवघ्या हांकेच्या अंतरावर ' नवी दिल्ली ' नांवाचें एक शहर असून, देशाच्याच काय, परदेशाच्या अंतरंगातहि खळबळ उडविणाऱ्या घटना तेथ घडतात याची दखल तरी कितीजणांस आहे कुणास ठाऊक ?—राजे बदलणार, काळ मागें पडणार, तत्त्वज्ञानें पुसून जाणार, जुन्या शस्त्रांना नवें पाणी येणार, आणि या धावाधावींत मारण-मरणांस ऊत येणार—हें येथें मुळीं सर्वांनीं नेहमीचेंच म्हणून जमेस धरलेलें. यापरतें अन्य कांहीं घडलें तरच तें आगळें ! नाहींपेक्षां या राजधानींत राहाणाऱ्या पौरजनांस 'वैऱ्याची रात्र ' आहे असें कधींच वाटत नाहीं आणि त्यायोगें त्यांची झोपमोडहि कधीं होत नाहीं.

प्रशस्त लालकिल्ल्याचा परिसर जुन्या दिल्लीस आटोपून आज अभंग उभा आहे. ओट्यावरचा एकादा ' चचा ' नाकांवर ओढलेल्या चष्म्याच्या भिंगातून ' केसरी ' वाचतां वाचतांच, परसांत उच्छृंखल हैदोस घालणाऱ्या वानरसेनेकडे ज्या दृष्टीनें पाहील, ती दृष्टि मला लालकिल्ल्याच्या नसलेल्या नेत्रांत चक्क दिसते ! तो ' करून सवरून ' भागलेला जराजर्जर तपस्वी समोर तरळणाऱ्या घडामोडी अशाच ज्येष्ठ निर्हेतुकतेनें न्याहाळीत असल्याचा भास होतो. तो वर्षानुवर्षें तेथें तसा खडा आहे. त्याला द्रुतगतीनें निसटणाऱ्या चारदोन मिनिटांचें काय होय ? समोरच्या भव्य जुम्मा मशिदीचा शेजार त्याला किती अमोल ! वाटत असेल त्याला त्याच्या काळांतील ती एक व्यक्ति. आणि अगदी शेजारी खडी असल्यानें, सुखदुःखाचे निर्लेप आलाप करण्यांत, त्याच्या घटकान् घटका संपत असतील.

पण खरें म्हणजे माझें मन जुन्या दिल्लीच्या या ऐतिहासिक ऐवजांत रमत नाहीं. काळाचें अखण्ड सातत्य पोटांत सामावून उभीं असलेलीं फारच थोडीं शहरें, मला वाटतें, दिल्लीची बरोबरी करूं शकतील. कुरुक्षेत्रापासून ते राजघाटापर्यंतच्या दृश्य अवकाशांत सामावलेलीं असंख्य मिनिटें जेव्हां भावनेच्या कल्लोळांत फुटतात तेव्हां त्यांतून बाहेर पडणारी इतिहासाच्या अणुशक्तीची किमया जाणीवेचा सारा प्रदेश बेचिराख करते ! घटना अनंत, स्वरूप एक ! एकच धडा पण गिरवून गिरवून घटवलेला ! उद्दिष्ट एकच पण किती अनेक वाटांनीं तें साध्य करण्याची प्रचंड यातायात. अगदीं जुनीं जुनींच ' गिरमिटें ' आणि ' नवीन वळसे ' !

नव्या दिल्लीची कर्तृत्वशक्ति, जुन्या स्मृतींना अंमळ मागें रेटून मनगटांत नाचत असल्याचा प्रत्यय येतो. येथील सर्वच आंखीव, आटोपशीर, योजनाबद्ध. जणूं कोटी कोटी जनतेचें भाग्य शिल्पिण्यास बद्धपरिकर असलेली प्रचंड सेना एका ताला-सुरावर पावलें टाकीत आहे ! राष्ट्रपति-भवनाच्या दोन्ही अंगास उभे असलेले ते दोन भव्य प्रासाद ' कार्यकारी ' सत्तेच्या निवासास अगदीं अनुरूपच वाटतात. शेजारींच 'चक्राकार' आणि अतिभव्य उभें असलेलें संसद्गृह आपल्या वर्तुलाकृतीनें उच्च पातळीवरील वादविवादाचे अंगविशेष उघड

करून दाखवतें. या इमारतीच बाहेरून एकदम डोळ्यांत भरणारे ते प्रचंड खांब लोकशाही राजवटीचे आणि एकूण लोकशाही जीवनाचे खरेखुरे आधारस्तंभ वाटतात. या प्रशस्त इमारतीचें आंत ज्या घडामोडी दिवसानुदिवस होत राहातात त्यांचा अचंबा तेथील इंच इंच जागेसहि वाटल्याशिवाय रहात नसेल. मधल्या विस्तीर्ण चौकांत क्षणभर उभें राहिलें तर दृष्टीस अतोनात सुख तर होतेंच पण मनहि भांबावून जातें. समोरून जाणाऱ्या चार माणसांतील तीन व्यक्ती तरी जागतिक घडामोडींशीं संबद्ध असलेल्यापैकीं असतात. मधमाशांचें मोहोळ फुटावें तसें माणसांचें मोहोळ फुटून तीं चारीं बाजूस गुंजारव करीत असल्याचा जो गंमतीचा अनुभव तेथें येतो, तो माझ्यासारख्याला फार आनंदाचा वाटत असल्यास नवल नाहीं. तशी माणसांची वाण या देशांत आहे अशांतला भाग नाहीं. पण येथील माणसें आणि इतरत्र आढळणारीं माणसें यांत केवढा तरी फरक आहे! अगदीं सरळसरळ पाहिलें तरीहि येथील प्रत्येक सदस्य सहस्रावधि लोकांचें जिणें जगत आहेच ना! क्षणभर तुम्ही संसदेच्या आंतील चौकांत उभे राहा. एका बाजूस कृपलानींची कृश मूर्ति धीरे धीरे आंत चाललेली दिसेल. दृष्टि तेथून काढली तर टंडनबाबूंची ऋषितुल्य प्रतिमा तिच्या आढळांत येईल. आणखी पलिकडे पहाल तर कृष्ण मेनन यांच्या मुद्रेवरील राजनीतिपटुता तुमचें लक्ष वेधून घेईल. भव्य आणि सुंदर देहयष्टींतील पृथ्वीराज कपूर समोरून येणाऱ्या आझादांना किंवा सुचेता कृपलानींना किंवा पंडितजींना नम्र कुर्निसात करतांना दिसतील. पृथ्वीराज नाट्यप्रवीण असतील, नटश्रेष्ठ असतील पण त्यांना थोर राजकारणी पुरुष वंदनीयच वाटणार आणि ते तसें वाटतात म्हणूनच त्यांच्या नम्र अभिवादनाचें चेतोहर नाट्य तिथें पहातांना दृष्टि त्यावर खिळून राहाते. डाव्या हातास घाइघाईनें धांवणारी एक स्त्री-व्यक्ति नजरेंतून सुटूं शकत नाहीं. ही उग्या-पुऱ्या उंचीची, तेजस्वी, सुहास्यवदन व्यक्ति आतां समोर दिसेल, तर उद्याच पालम विमानतळावर इंग्लंडच्या सम्राज्ञीची भेट घेण्याच्या वाटेवर असेल; तर परवा 'यूनो'च्या अध्यक्षपदाचा स्वीकार करण्यासाठीं तेथून पुनः उड्डाण करते आहे, हें वाचावें लागेल. किती तऱ्हेतऱ्हेचीं आयुष्यें एकाच व्यक्तींत सामावलेलीं! ही मानवी आयुष्याची सार्थकता आहे. ही मनुष्यजातीची अभ्युदयार्थ चाललेल्या धडपडीवरील साय आहे. या अनन्यसाधारण अनुभूतीचें वर्णन करावें तरी कसें? सर्वसाधारण माणसासारखी एक व्यक्ति आपल्या बुद्धिप्रभावानें कशी तळपते त्याचें आश्चर्य करावें, कीं चारी खंडांना पहातां पहातां प्रदक्षिणा घालून पुनः घरीं पोहोंचविणाऱ्या आधुनिक विज्ञानप्रगतीला धन्यवाद द्यावेत, कीं ऐषआरामी जिण्याचा त्याग करून समष्टीच्या सुखद जीवनासाठीं स्वेच्छेनें कष्टरत होणाऱ्या प्रगल्भ मानवी बुद्धीचें कौतुक करावें, कीं मनांत वारंवार उचंबळून येणारें एक प्रकारचें तौलनिक असमाधान चघळीत राहावें-इत्यादि विचार येऊन मति गुंग होते खरी!

संसदेच्या प्रांगणांत किंवा त्या संबंध इमारतींतच एक प्रकारचें अभिनव नाट्य प्रत्ययास येतें. असाधारण नाट्याची निशाणीच ही आहे कीं तें पहात असतांना वायुवेगानें आपण उंच, उंच वातावरणांत संचार करोत असल्याचा अनुभव यावा; टीचभर पोटासाठीं शिणवणारी क्षुद्र दैनंदिन वळवळ बाजूस सारून सूक्ष्म मानवी प्रश्नांची उकल करण्यास आपण एकत्र जमलों आहोंत अशी भावना निपजावी; स्वतःच कांहीं पराक्रम करीत आहोंत या जाणीवेनें रोमांचित व्हावें; जणु आपणच निर्माण केलेल्या दुनियेंतील कांहीं 'पात्रें' आपल्या अडचणी आपणांस सादर करीत आहेत असें वाटून, विधात्याच्या ज्येष्ठ दिमाखानें आपणास त्या पाहिल्या पाहिजेत असा कांहींसा प्रत्यय यावा! बरोबर हीच भावव्याकुलता संसदेच्या त्या प्रचंड इमल्यांत घडीघडी जाणवते. इमारतीची भव्यता, साधेपणा, आणि गांभीर्य एक गोष्ट प्रथमच मनावर ठसवते कीं ही इमारत स्थिर आहे आणि आंतील सारे सदस्य येणारे-जाणारे आहेत. मानवी जीवनाच्या क्षणभंगुरत्वामुळेंच केवळ हें नसून, इमारत कायम पण संसदीय सभासद दर पांच वर्षांनीं नवे, या गोष्टीमुळेंहि असें म्हणावेसें वाटत. ती न बोलणारी गंभीर इमारत आपल्या मनाशीं सतत विचार करीत आहे, आडाखे बांधीत आहे, अवलोकन करीत आहे, असें स्पष्ट भासतें.

आणि त्या दृश्य इमल्यापाठीमागें घडून राहिलेला केवढा तरी पुराणा, दीर्घ इतिहास आहे!







सामूहिक विचार-विनियम, परस्परांचे विचार समजून घेणें आणि समजावणें-हे मानवी समष्टिजीवनाचे किती साधे आचार वाटतात! पण कोण म्हणतो ते साधे आहेत? पन्नास, पंचाहत्तर हजार नागरिकांचें एका व्यक्तीनें प्रतिनिधित्व करावें, हें विचार-बालक जन्मलें तें किती रक्तपात, प्रसूतिवेदना व कालहरण करून! असंख्य जनतेवर मूठभर सत्ताधाऱ्यांनीं राज्य करावें हा तर इतिहासाचा आश्चर्यकारक दाखलाच आहे. त्याचें प्रात्यक्षिक इथें पहावयास मिळतें. संसदेची कल्पना तरी किती कष्टसाध्य ठरली! जनतेनें एकत्रित येऊन आपल्या मागण्या राजास सादर कराव्या या सहज घटनेमधूनच संसद्, एकत्र येणें, विचार-विनिमय निष्कर्ष इत्यादींची बांधणूक झाली. उण्यापुऱ्या सातशें वर्षांपूर्वी एक मागण्यांचा मसुदा जनतेनें इंग्लंडांत राजास सादर केला तेव्हां आपण एका महान् घटनेस जन्म देत आहोंत याची त्या बिचाऱ्यांना कल्पना तरी होती का? १२९५ मध्यें संसदेच्या आजच्या स्वरूपाशीं कांहींशी जुळणारी संसद् तिथें अस्तित्वांत आली. तेव्हांपासून त्यावर कालविशिष्ट संस्कार होत होत त्याला आजचें स्वरूप प्राप्त झालें. संसद् सुधारली असेल कदाचित्. त्याला बाह्यतः भव्य आकार आला असेलहि. पण समष्टिजीवनाचा आणि त्याच्या सुरक्षिततेचा प्रश्न सुटला काय? उघडीवाघडी दण्डशाही नष्ट झाली असेल, पण संसदेच्या कोनाकोपऱ्यांतून बेंगरुळपणें वावरणारी मतलबशाही चांगली बाळसेंच धरत राहिलेली नाहीं काय? एखाद्या पुराण्या आजाराप्रमाणेंच लोकशाहीच्या सांध्यासांध्यातून घर करून राहिलेली आणि जनतेच्या मतावर पोसलेली पण जनतेवरच विजय मिळवणारी, ही छुपी मतलबशाही निपटणें फार जिकीरीचें झाल आहे.

संसदेच्या प्रांगणांतील दृश्य आणखीहि एका बाबतींत असाधारण वाटतें. ती बाब म्हणजे येथें होणारें उभ्या भारताचें दर्शन. हजारों मैल दूर दूर असलेल्या खेड्यापाड्यांतून कुणीहि 'पंजाब, सिंध गुजरात, मराठा, द्राविड, उत्कल, वंग' हे सूर आळवावेत. रवींद्रबाबूंच्या कवित्वानें आणि नेताजींच्या शौर्यानें मराठ्याची छाती फुगावी किंवा शिवाजीच्या चित्तथरारक इतिहासानें पंजाब्यांना स्फुरण चढावें, किंवा इक्बालचें भूषण इतर प्रांतीयांनीं शिरीं मिरवावें. खण्डप्राय देशाच्या अष्टदिशांत खचून भरलेला इतिहास सर्वांनाच प्रेरणा देत आला आहे. तरीपण आपपल्या प्रांतांत अनुभवास येणारी ही अन्यप्रांतीय चेतना केवळ बौद्धिक, केवळ भावगम्य असल्यास नवल नाहीं. असें एक ठिकाण, अशी एक वेळ आणि प्रसंग काय तो फक्त या संसदेंतच जाणवतो कीं जिथें विस्कळीत प्रांतीयांचीं सुखदुःखें एकाच 'कढई'त वितळत राहातात! प्रांतोप्रांतींच्या ईर्षा, असूया, आशा, आकांक्षा येथें मूर्तरूप घेण्याची कोशीस करतात! आपापलीं गाऱ्हाणीं घेऊन देशाच्या वेशीवर टांगण्यासाठीं इथेंच काय ती फक्त सर्वांची धडपड चालू असते. ही धडपड नेहमींच हितकर असते असें मात्र नाहीं. मनुष्यस्वभाव येथें जमा होणाऱ्या महशूर जनसेवकांनां सोडीत नाहींच. उलट, तो कधींकधीं उग्र रूपहि धारण करतो. पण तरीहि आसिंधु-हिमाचल भारताची अंगभूत एकता मात्र दृष्टीआड होत नाहीं. आपली बहुप्रसवा भारतभूमि पुनःपुनः युगपुरुष निर्माण करून त्याकरवीं मानवी सुखदुःखांवर प्रयोग करीत राहिली आहे! मैत्री-गार्गेयींचा तात्त्विक सुसंवाद फार जुना नसावा असें इथें जाणवतें. शंकराचार्य आणि गौतम, रामतीर्थ आणि विवेकानंद, महात्माजी आणि नेताजी या साऱ्यांचा वारसदार हा देश आजहि त्या कर्तृत्वाचें अवजड ओझें पाठीशीं बांधून भविष्याचा दुस्तर पहाड चढतच आहे. या देशाच्या प्रौढत्वाचा साक्षात्कार, सर्वसमावेशकत्वाची जाणीव, 'पूर्वदिव्यत्वाची प्रचीति' आणि 'रम्य भावी काला'चा विश्वास देण्याचें सामर्थ्य संसदेच्या भव्य मंदिरांतील सर्वप्रांतीय जन-सेवकांच्या या मेळाव्यांतच समाविष्ट झालें असावें.

संसदेच्या या भव्य मंदिरांतून बाहेर पडावें तों 'इंडिया गेट'चा उत्तुंग दरवाजा आणि तेथून राष्ट्रपतिभवनास सांधणारा विस्तीर्ण, आंखीव 'राजमार्ग' डोळ्यांत भरतो. हा राजरस्ता ( King's Way ) नयनरम्य तर आहेच. पण ऋतुमानाप्रमाणें तो अंगावर निरनिराळी वस्त्रें जीं परिधान करतो, तींहि डोळ्यांना अनिवार आनंद देतात. या रस्त्याच्या दोन्ही अंगास लांबवर हिरवीं कुरणें दिसून येतील. त्या कुरणांच्या समीप पाण्याचे बांधून काढलेले ते लांबरुंद तलाव दिसतील. अधूनमधून थुंयथुंय उडणारीं तीं कारंजीं. आणि या नयनरम्य वातावरणाची पार्श्वभूमि










## दिल्लीच्या परिसरांत चार घटका !

म्हणून समोर, आजूबाजूस चारी दिशांस दिसणाऱ्या तांबड्यालाल दगडांत बांधून काढलेल्या त्या उत्तुंग, भव्य इमारती. हिरव्या रंगाचा निसर्ग आणि तांबड्या दगडांच्या इमारती यांतील रंगसंगतींत एक प्रकारची अहमहमिकाच लागल्यासारखी वाटते. लालभडक प्रचंड शिलांचें हें बांधकाम चौफेर सारखेंच दिसतें. हा लालपणा आला कुठून ? ही रक्तरंजित राजकीय उलथापालथीची निशाणी म्हणावी कीं बेहोष मर्दुमकीची डोळ्यांतील धुंदी म्हणावी ?

वातावरणावर एकच एक ठसा उठवणाऱ्या लालभडक प्रचंड शिळांचें हें बांधकाम व निसर्गसौंदर्यांत बुचकळून निघालेले त्यामागील मानवी श्रम. निसर्गाचा मन मानेल तसा आकार घेणारा आडदांडपणा इथें मानवी शक्ति व बुद्धि यांनीं तासून, ठोकून आटोपांत आणलेला पाहून दृष्टि स्तिमित व्हावी अशी येथील शोभा व कलाकुसर आहे. पण आश्चर्य असें कीं या वातावरणांत निर्भेळ निसर्गसौंदर्याचा साक्षात्कार होत नाहीं. येथील झाड-पालाहि राजकीय दडपणाखालीं जडमूढ झाल्यासारखा वाटतो ! येथील पाण्याचीं कारंजींहि जागतिक परिस्फोटक परिस्थितीमुळें मनमुराद उचंबळत नसून, दबकत दबकत आंत-बाहेर करीत असल्यासारखें जाणवतें. येथील हिरवीगार विस्तीर्ण कुरणें ! इवल्या इवल्या रानफुलांसाठीं, खरें पहातां हे गालीचे असायचे. रंगीबेरंगी फुलपाखरांनीं त्यांवर रुंजी घालीत बागडायचें. पण हाहि देखावा येथें कधीं आढळांत येत नाहीं जणु हीं निसर्गबाळें या गांवचींच नव्हत ! जणूं येथील स्वयंभू निसर्ग मानवी हस्तस्पर्शानें बाटगा झाला आहे. या विस्तीर्ण अवकाशांत एक प्रकारची भयावहता भरून राहिल्यासारखें जाणवतें. या कोवळया निसर्गाच्या पोटीं एक प्रकारची दडस असल्याचें प्रत्ययास येतें. हिरव्या मैदानावरील कोवळया तृणांकुरांनीं उपजताच माना टाकल्या आहेत जशा ! कुठें काय घडेल आणि पहातां पहातां घोडेस्वारांच्या उन्मत्त टांचाखालीं भुइसपाट व्हावें लागेल याची चिंताच त्यांना पडली आहे ! शहराचें सारें सौंदर्य या अनिश्चित भीतीनें काळवंडल्या सारखें वाटतें !

खडा कुतुबमिनार असो कीं पावन बिर्लामंदिर असो, शांत राजघाट असो कीं भयाण बिर्ला हाऊस असो – दिल्लीच्या आसमंतांतील अणुरेणू जेवढे बोलके वाटतात आणि बोलण्यासारखेहि त्यांचेजवळ जेवढें आहे तेवढें इतरत्र एकट्यादुकट्या शहराच्या परिसरांत क्वचितच असेल. शतकानुशतकांच्या इतिहासाचें अवजड ओझें पाठीशीं घेऊन वावरणारी येथील संस्कृति सतत कार्यरत आहे. नव्या कालांतील नवे प्रश्न तिला भेडसावीत आहेत. गीताईचा ठेवा जिनें प्रसविला तिला प्रेतांच्या खचावर गुडघे टेकून प्रार्थना करणाऱ्या व कृतकृत्यता अनुभवणाऱ्या तैमुरलाहि अंकीं खेळवणें भाग पडलें ! तिनें दाक्षिणात्य स्वातंत्र्यझेपेची अटकेपार भरारीहि उघड्या डोळयांनीं पाहिली ! 'दिवाण-इ-आम' आणि 'दिवाण-इ-खास'च्या दरबारी थाटाचा आस्वाद तिनें घेतला. विलायती शराबीची धुंदीहि कांहीं काल तिच्या डोळ्यावर चढली. शांतीचे प्रेषित तिनें पाहिले , रक्तपिपासूंची चटक तिनें चाखली ! – अगदीं कालपर्यंत हेंच इथें चालू आहे; हेंच इथें घडत आहे !

येथील इतिहासाची व त्याच्या उच्छिष्टांची चव घेत घेत कांहीं काळ राजधानीच्या रस्त्यांरस्त्यांतून मुशाफिरी केल्यावर एकच एक ठसा मनावर उतरतो कीं येथील पुराणा इतिहास काळपोटीं जमा आहे. येथें दृष्टि 'काल'च्या घटितापेक्षां 'उद्यां'च्या पोटांतील अघटितांवर केंद्रित करण्याची जरूरी आहे. इतिहास दृष्टीखालून घालण्यासाठीं नव्हे तो घडविण्यासाठीं इथें धडपड करणें अगत्याचें आहे. विषाद, शोक, आश्चर्य या भावांना इथें फारशी जागा नाहीं. उत्साही कार्यमग्नताच काय ती इथें संभवते. याच विचारांच्या ओघांत दृष्टि कुतुबवरून हळुं हळुं खालीं उतरते, राजघाटावरील प्रशांत समाधींत संचार करणाऱ्या तत्त्वज्ञानाची स्फूर्ति घेऊन परत फिरते आणि पुनश्च संसदेंतील जीवनकलहाशीं निगडित असलेल्या चर्चा-चर्वणांत आपला सूर मिसळून भविष्यकालीन सुराज्याचा रांधा घोटीत राहाते.

---








प्रा. दे. अ. दाभोलकर

# भूदानयज्ञ : कांहीं प्रश्न

[ डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या वांचे कॉलेजमधील अर्थशास्त्राचे प्राध्यापक प्रा. देवदत्त अ. दाभोलकर हे जगन्नाथपुरी येथील सर्वोदयसंमेलनाला ( २५ व २६ मार्च १९५५ ) गेले होते. त्यानंतर ते १ एप्रिलपासून कांहीं दिवस आचार्य विनोबांबरोबर त्यांच्या पदयात्रेंतहि होते. त्या वेळीं आचार्य विनोबांशीं कांहीं प्रश्नांवर संभाषण-चर्चा करण्याची संधि त्यांना मिळाली. त्या वेळीं भूदानयज्ञविचारांशीं संबद्ध असे कांहीं प्रश्न प्रा. दाभोलकरांनीं आचार्य विनोबांना विचारले. त्यांपैकीं कांहीं प्रश्न व त्यांचीं विनोबांनीं दिलेलीं उत्तरें पुढें दिलीं आहेत. 'नवभारता' चा 'भूदान-विशेषांक' वाचकांपुढें आहेच. त्याच्या पार्श्वभूमीवर ही प्रश्नोत्तररूप चर्चा वाचकांस निःसंशय उद्बोधक वाटेल. या चर्चेचा लाभ वाचकांस करून दिल्याबद्दल प्रा. दाभोलकर यांचे ऋणी आहोंत.—का. सं. ]

**प्रश्न** : ग्रामीण अर्थरचना, ग्रामराज्यें, ग्रामोद्योग हा आदर्श मध्ययुगीन नाहीं काय ?

**उत्तर** : या वादांत मी आतां शिरूं इच्छीत नाहीं. भूदानांतून या गोष्टी निघतातच असें नाहीं. भूदानापुरतें सहकार्य करून वरील बाबतींत प्रत्येकाला आपलीं स्वतंत्र मतें राखतां येतील.

**प्रश्न** : भारताची लोकसंख्या आहे ती जादा आहे व तिच्या आणखी वाढींत धोका आहे असें आपल्याला वाटत नाहीं काय ?

**उत्तर** : लोकसंख्येच्या वाढींत धोका आहे असें मी मानीत नाहीं. प्रत्येक माणसाबरोबर काम करण्यासाठीं दोन हातहि असतात. असें असतांहि आज जी बेकारी आढळते तिचीं तीन कारणें सांगतां येतील: आळस, अज्ञान व आर्थिक विषमता हीं तीं तीन कारणें होत. ह्या तीन गोष्टी बदलल्या कीं लोकसंख्येच्या वाढीची भीति वाटण्याचें कारण नाहीं.

**प्रश्न** : भूदानांतून साम्ययोग अटळ आहे काय ?

**उत्तर** : वरील उत्तरांतच याहि प्रश्नाचें उत्तर सामावलें आहे. साम्ययोगावर विश्वास न ठेवणारे, प्रार्थनेवर व देवावर विश्वास न ठेवणारे लोकहि भूदानाचें तत्त्व मान्य असेल तर भूदानाच्या चळवळींत सहकार्य देऊं शकतात. असें सहकार्य करीत असतां कदाचित् आमचे इतर विचार त्यांना पटतील. कदाचित् ते लोक आमचें मतपरिवर्तन करतील असाहि संभव होऊं शकतो.

**प्रश्न** : जमिनीच्या फेरवांटणीचा सरकारचा हक्क आज सर्वत्र मानला जात आहे. भूदानामुळें मालकी हक्काची भावना वाढीला लागते व सरकारच्या आज मानल्या जाणाऱ्या हक्काला बाधा उत्पन्न होते— या आक्षेपाविषयीं आपल्याला काय सांगावयाचें आहे ?

**उत्तर** : भूदानानें मालकी हक्काची भावना वाढीला लागण्याचें कारण नाहीं. यावच्चन्द्रदिवाकरौ मालकी हक्क, कोणालाच कशाचाहि दिलेला नसतो. आज भूदान दिलेल्या माणसाकडेहि आम्ही पुन्हा जाऊन अधिक दान मागूं शकतों. अखेर तर सर्व जमीन सर्व संपत्ति समाजाच्याच मालकीची आहे.

सरकारचा हक्क आज सर्वत्र मानला जात आहे असें सांगणेंहि बरोबर नाहीं. तसें असेल तर सरकार अजूनहि ceiling च्या गोष्टी कां बोलतें ? सर्व भूमीचें पुनर्वितरण कां करीत नाहीं ? सरकार जनमनाच्या फार पुढें जाऊं शकत नाहीं. याचाच अर्थ जमिनीविषयींचे हक्क जनमतानें सरकारच्या अधीन पूर्णपणें झालेले नाहींत.

**प्रश्न** : भूदानांत दयाबुद्धि आहे, लोकशाही वृत्तींची जोपासना आहे ही गोष्ट अनेकांना पटते. परंतु भारताच्या आर्थिक विकासाच्या मार्गांत भूदानामुळें अडचणी निर्माण होतील असेंहि त्यांना वाटतें.

**उत्तर** : अशा प्रामाणिक मताच्या लोकांनीं भूदानाला विरोधच केला पाहिजे. केवळ दयाबुद्धि पुरेशी नाहीं, जिच्यामुळें भावी हानि होणार अशी दयाबुद्धि अनुपकारक आहे. मुलगा आजारी असतांना पथ्य न पाळतां आई प्रेमानें त्याला गोडधोड जेऊं घालील तर तें चुकीचेंच ठरेल. प्रेमानें केलें असलें तरी प्राणघातकच ठरेल. फार तर तिला आपण फांशी देणार नाहीं इतकेंच.



अनुक्रमणिका






**प्रश्न :** भूदानामुळें सामाजिक न्याय स्थापन होतो. परंतु आर्थिक समृद्धीचें आश्वासन भूदानांत नाहीं असा आक्षेप कांहीं जण घेतात.

**उत्तर :** मला सामाजिक न्याय हवा आहे, आर्थिक समृद्धीहि हवी आहे, आणखीहि कांहीं चांगल्या गोष्टी असल्यास हव्या आहेत. जितक्या अधिक चांगल्या गोष्टी साधल्या जातील तितकें चांगलेंच. परंतु अन्यायनिवारणाला मी सर्वांत अधिक महत्त्व देतों. ज्या गोष्टीमुळें आजचा अन्याय वाढणार असेल किंवा अन्यायाचें निवारण होणें लांबणीवर पडणार असेल ती गोष्ट मला कधींहि संमत होणार नाहीं.

**प्रश्न :** क्रान्ति व्यक्तिपरिवर्तनानें होऊं शकते कीं समाजपरिवर्तनानें ?

**उत्तर :** या दोहोंचेंहि महत्त्व आहे. एकाचाच आग्रह धरणें दुराग्रहीपणाचें आहे. आपल्या विचारांत प्रवाहिता ( liquidity ), लवचिकपणा पाहिजे. विचार घन झाले कीं घण मारावा लागतो.

**प्रश्न :** ज्या गोष्टीविषयीं प्रतिपक्षांत प्रामाणिक मतभेद आहेत व ज्या गोष्टीची सत्यासत्यता प्रयोगाखेरीज ठरणें अशक्य आहे त्या गोष्टीसाठीं सत्याग्रह करणें चुकीचें आहे हें आपल्याला मान्य आहे काय ?

**उत्तर :** हा विचार मला मान्य आहे. भूदान मागावयास एखादा गेला आणि दाता जर त्याला असें सांगूं लागला कीं जमिनीचे तुकडे पडल्यामुळें राष्ट्राचें अधिक नुकसान होईल असें मला वाटतें, तर अशा ठिकाणीं सत्याग्रहाचा आग्रही वापर करणें अयुक्त आहे. अर्थात् या ठिकाणीं दात्याची भूमिका प्रामाणिक आहे असें गृहीत धरलें आहे.

**प्रश्न :** सौम्यतम सत्याग्रहाची कल्पना जरा अधिक स्पष्ट करतां येईल काय ?

**उत्तर :** ही कल्पना खासगी संभाषणांत मी कांहीं वेळां मांडली होती. प्रकटपणें परवां अधिवेशनांत मांडली. सौम्यतम सत्याग्रहाचें स्वरूप व तंत्र कसें असावें हें योग्य वेळीं विचारवंत ठरवतील. अहिंसात्मक सत्याग्रहाचें स्वरूप उत्तरोत्तर अधिकाधिक सौम्य होत गेलें पाहिजे, उग्र होत जातां कामा नये – हा मुख्य विचार मान्य झाला पाहिजे. जमीन दिली नाहींत तर मारलें जाल अशा प्रचारानें जमीन मिळविणें हाहि एक हिंसेचाच प्रकार आहे असें मी मानतों परिणामांची जाणीव करून देणें वेगळें व धाक घालणें वेगळें. अशा रीतीनें जमीन मागितली तर देऊं नका असें मी लोकांना सांगतों.

**प्रश्न :** सौम्यतम सत्याग्रह याचाच अर्थ प्रेम व ज्ञान यांना अधिकाधिक प्रभावित करणें असा नाहीं काय ?

**उत्तर :** होय, तसाच अर्थ आहे.

**प्रश्न :** आज सुशिक्षित वर्गांत, सरकारी पदाधिकाऱ्यांत भूदानाविषयीं उपेक्षा वृत्ति आढळते.

**उत्तर :** चळवळ जसजशी वाढीला लागेल तसतशी ही उपेक्षा कमी होईल व हे लोक भूदानाचा आस्थेनें विचार करूं लागतील.

---

## साहित्याचें स्वरूप

साहित्य म्हणजे अहिंसा अशी मी व्याख्या करतों. सर्वोत्तम साहित्य सूचक असतें. सूचक साहित्य वाचकावर आक्रमण करीत नाहीं. उपदेश कितीहि हितकर असेना त्याचा प्रहार जर एखाद्यावर होऊं लागला, तर तो उपदेश त्याला वांछनीय वाटणार नाहीं.... साहित्यांत अशी शक्ति आहे कीं ज्यामुळें 'श्रम' 'शम' होतात. श्रम आणि विश्रान्ति साहित्यांत बिनविरोध वास करतात. हृदयाला साहित्याचें ओझें कधींच जाणवत नाहीं.... साहित्याचीं सर्वोत्तम लक्षणें मला आकाशांत दिसतात. आकाशदर्शनाचा कधींच कुणाला शीण जाणवत नाहीं. आकाशासारखेंच साहित्य व्यापक, अविरोधी आणि गति देणारें असतें. आकाशाच्या निळ्या रंगामुळें कधींच थकवा येत नाहीं. साहित्यसेवनाचाहि शीण कधींच जाणवतां कामा नये. साहित्य वाचतांना जर ' आतां पुरे ' असें वाटलें, तर त्या साहित्यांत कांहींतरी कमी आहे.... उत्तम साहित्य हें अल्पाक्षर असतें. अल्पाक्षरत्व म्हणजे थोड्या शब्दांत अधिक सुचविण्याची शक्ति.

—— आचार्य विनोबा

( पुरी-संमेलनांत साहित्यिकांपुढें केलेल्या भाषणांतून २६-३-५५ )








# सारसंकलन

## जपानी जनतेचें मत

जपानमधील सार्वत्रिक निवडणुकीचें विश्लेषण करतांना ' रूटर'चा बातमीदार म्हणतो :

" जपानमध्यें नुकत्याच झालेल्या युद्धोत्तर काळांतील सहाव्या सार्वत्रिक निवडणुकींच्या निकालावरून आंतरराष्ट्रीय राजकारणांत मधल्या मार्गाचा अवलंब करील असें सरकार जपानी जनतेला हवें आहे हें स्पष्ट झालें आहे. गेल्या सात वर्षांत लिबरल पक्षानें सर्वस्वीं अमेरिकेला अनुकूल असें परराष्ट्रीय धोरण अवलंबिलें होतें. ४६७ सभासदांच्या सभागृहांत या पक्षाच्या प्रतिनिधींची संख्या १८० वरून ११२ वर घसरली आहे. यावरून देशाला हें धोरण पूर्णतया मान्य नसावेंसें दिसतें. उलट, अलीकडेच स्थापन झालेल्या डेमोक्रॅटिक पक्षाच्या सभासदांची संख्या १२४ वरून १८५ वर गेली आहे. यावरून पाश्चात्त्य गटाबरोबर जपाननें रहावें असें जरी जनतेचें मत असलें तरी त्याबरोबरच कम्युनिस्ट गटाविषयीं, आणि विशेषतः रशिया व चीनविषयीं स्वतंत्र धोरण आंखण्याची आणि त्याबरोबरच आशियाई राष्ट्रांशीं अधिक निकटवर्ती सहकार्य करण्याची योग्य वेळ आतां आली आहे असेंहि सूचित होतें. देशांतील आजच्या परिस्थितींत विशेष मूलभूत फरक करूं न इच्छिणाऱ्या लिबरल् व डेमोक्रॅटिक या दोन्ही पक्षांना मिळून एकंदर ५३ टक्के मतें मिळालीं. उलट, समाजवाद्यांना अवघें २९ टक्के मतदान झालें. यावरून जपानी जनतेला तूर्त मूलभूत बदल नको असावेत असें म्हणतां येईल.

" युद्धोत्तर कांळांतील आर्थिक जीवन स्थिरस्थावर करण्याचें कार्य उद्योगपतींचा पाठिंबा असलेल्या परंपरावादी शक्तींवरच जपानी जनतेनें सोंपवलें आहे. "

## मधला मार्ग ?

' नैतिक अरिष्ट ' या शीर्षकाखालीं लंडनचें ' टाईम्स् ' पत्र ता. १४ मार्चच्या अंकांत लिहितें :

" जोंवर युद्धाची भीति कायम राहील तोंवर विनाश आणि त्यापासून बचाव यांच्या शर्यतींत कोट्यवधि रुपयांचा चुराडा होत रहाणार आणि अधिकाधिक भयानक स्वरूपाचीं शस्त्रास्त्रें निर्माण होत रहाणार. या बाबतींत मधला मार्ग शोधण्यांत हंशील नाहीं. कारण, असा मार्ग मुळीं अस्तित्वांतच नाहीं. बळी जाणाऱ्या स्वजनांची फसवणूक आणि परकीय आक्रमकांना निमंत्रण असा दुहेरी धोका अशा मार्गांत आहे.

" तथापि सर विन्स्टन चर्चिल यांनीं म्हटल्याप्रमाणें शस्त्रोत्पादनाच्या या शर्यतींत केवळ आघाडावर राहिल्यानें भागेल असें समजण्याचें कारण नाहीं. आघाडीवर रहाण्यांतील फायदा आधुनिक जगांत आतां नाहींसा होत आहे. विरोधकांचें संहारसामर्थ्य आपल्यापेक्षां कितीहि कमी असलें तरी तें इतकें मोठें असणार कीं त्यायोगें दोहोंतील फरक हा अर्थशून्यच व्हावा.

" अशा परिस्थितींत या सर्व प्रकाराकडे पूर्णतया पाठ फिरविणें एवढाच नैतिक मार्ग शिल्लक रहातो असें म्हणणारे प्रामाणिक व निष्ठावंत स्त्रीपुरुष पुढें येणें स्वाभाविक आहे. साम्यवादाचा इतिहास हा आक्रमणाचा इतिहास नाहीं व म्हणून अन्य जगाला त्यापासून वाटणारी भीति समर्थनीय नाहीं असेंहि त्यांतील कांहींचें म्हणणें आहे. फिन्लंड आणि पोलंड, कोरिया आणि ऑस्ट्रिया यांचा त्यांना विसर पडत आहे. रशियाच्या अंकित असलेल्या राष्ट्रांत हिट्लरचा पाठलाग करीत लाल सेना घुसली, तिच्या आश्रयानें तेथील तथाकथित क्रांत्या झाल्या; मात्र ती तेथून परत कधींच फिरली नाहीं. याहि घटनेकडे ते दुर्लक्ष करतात. वेगळ्या स्वरूपाचें असलें तरी झेकोस्लोवाकियांत आक्रमणच झालें होतें इकडे त्यांचें लक्ष जात नाहीं.

"तर मग या स्वयंनिर्मित कड्यापासून मानवजातीला मागें ओढण्याचा कोणताच मार्ग नाहीं काय ? प्रथम फ्रान्सनें पश्चिम युरोपांतील करारांना मान्यता देणें आवश्यक होय. ही मान्यता मिळेपर्यंत तिच्या विरुद्ध रशिया सर्व प्रकारची धडपड करीत राहील. ( कोणताहि महत्त्वाचा निर्णय घेण्यापूर्वी रशियाशीं त्या संबंधीं विचारविनिमय करण्याचा अनेकवार यत्न केला आहे;

त्यांतून कांहींहि निष्पन्न होत नाहीं. )

" ही मान्यता मिळाल्यानंतर रशियाची तयारी असल्यास पाश्चात्त्य राष्ट्रें आणि रशिया यांच्यांत बोलणीं होऊं शकतील हें आजवर सांगितलें त्यापेक्षां अधिक उच्चरवानें आम्हीं सांगावयास पाहिजे. त्याबरोबरच निःशस्त्रीकरणासाठीं सुरू असलेले प्रयत्न यशस्वी व्हावेत म्हणून आपलें नैतिक व राजकीय वजन ब्रिटननें सर्वस्वीं खर्चीं घातलें पाहिजे. "

## नैतिक मूल्यांची घसरगुंडी

नैतिक मूल्यांची सध्यां सुरू असलेली घसरगुंडी थांबवली नाहीं तर जग पुनः रानटी अवस्थेप्रत गेल्यावांचून रहाणार नाहीं असा इषारा लंडन येथील एका भाषणांत प्रा० गिल्बर्ट मरे यांनीं दिला. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस संकटांची जाणीव तत्कालीनांना होऊं शकली नाहीं; तथापि आतां दुसरें महायुद्ध संपल्यानंतर पुढें आलेले धोके न समजणें म्हणजे शुद्ध आंधळेपणा होय—असें सांगून ते पुढें म्हणाले: " यांतील एक धोका म्हणजे जर्मनी, रशिया आणि थोड्याबहुत अंशानें सर्व युरोपखंडांत झालेला कायदा, सत्य आणि माणुसकी—ज्यांना नाझी आणि कम्युनिस्ट हे ' भांडवलशाही नीतिमत्ता ' असें म्हणतात—यांचा आकस्मिक व भयानक अधःपात हा होय.

" विसाव्या शतकांतील सुसंस्कृत जगांत हें अगदीं दूरान्वयानें देखील शक्य आहे अशी आपण कल्पनाहि करूं शकत नव्हतों. संस्कृतीचें कवचच जणुं उडून जावें आणि त्याखालीं मानवी स्वभावाचें यथार्थ स्वरूप दाखवणारा तळ नसलेला खड्डा दृष्टोत्पत्तीस यावा अशी अवस्था आज प्रत्ययास येत आहे. ज्यांत पोलिस हाल वा छळ करणें या उपायांचा अवलंब करीत नाहींत, न्यायाधीश लांच घेत नाहींत, अधिकारी स्वतःला कायद्याहून श्रेष्ठ समजत नाहींत किंवा विरोधकांना गुन्हेगाराप्रमाणें वागवीत नाहींत असा समाज युद्धपूर्वकाळांत युरोपांत होता. आतां हीं मूल्यें मानलीं जात नाहींत. ज्यांना या बाबतींत कसलेंच तारतम्य नाहीं अशा समाजसंस्थांनीं त्यांना वेढलें असून दडपून टाकलें आहे.

" तिसऱ्या महायुद्धाचें संकट सर्वांच्या परिचयाचें आहे. तथापि आमच्या जीवनांत प्रत्यक्ष आढळणाऱ्या दुसऱ्या एका महत्त्वाच्या संकटाकडे मात्र अजून कोणाचें विशेष लक्ष गेलेलें दिसत नाहीं. चांगलें आणि कमी चांगलें ( the less good ) हीं सारखींच आहेत असें समजण्याच्या प्रवृत्तीमुळें संस्कृतीची पातळी खालीं येत आहे. आणि त्याबरोबरच पाश्चात्त्य वैचारिक व भावनात्मक मूल्यांचें ग्रहण न करतां केवळ तंत्रविद्या आत्मसात् केलेल्या समाजाच्या वर्चस्वामुळें सुसंस्कृत जग पुनः रानटी अवस्थेप्रत जाऊं लागलें आहे, हें तें संकट होय.

" मला वाटतें, हें आजचें एक खरें संकट आहे. त्याची जाणीव झाली तरच कदाचित् त्याचें निराकरण करतां येईल. यापुढें सुरू असलेली सांस्कृतिक व नतिक मूल्यांची घसरगुंडी थांबावी आणि आजवर झालेलें नुकसान भरून यावें या करितां अमेरिका आणि पाश्चात्त्य राष्ट्रें-विशेषतः राष्ट्रकुलांतील राष्ट्रें — यांनीं निकराचे प्रयत्न करणें आवश्यक आहे. "

## अणूंच्या उत्सर्जनाचे परिणाम

अणूंच्या उत्सर्जना-( Radiation ) च्या परिणामाविषयीं ता. २४ मार्चच्या अंकांत 'न्यूज क्रॉनिकल ' पत्र म्हणतें :

" अणुशास्त्रज्ञांच्या मासिकाच्या आज सकाळीं प्रसिद्ध झालेल्या अंकांतील एका लेखांत प्रा० रोब्ला या अनुभवी व जबाबदार अणुशास्त्रज्ञानें अणूंच्या उत्सर्जनाचा आमच्यावर आजवर झालेला परिणाम आणि त्याच्या वाढीची गति यांविषयीं निश्चित माहिती सरकारनें मिळविणें आणि ती प्रसिद्ध करणें अत्यंत आवश्यक आहे असें मत व्यक्त केलें आहे.

" ता. २२ मार्च रोजीं ' कॉमन्स ' सभागृहांत अणूंच्या उत्सर्जनाच्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठीं १९५५–५६ सालांत ' मेडिकल रिसर्च कौंसिल ' जवळ २ लक्ष ८ हजार पौंडाची रक्कम आहे अशी माहिती आरोग्यमंत्री श्री. आएन मॅक्लिऑड यांनीं दिली. आणि अधिक तरतूद असावी अशी विनंति आल्यास अर्थमंत्री तिचा अनुकूल विचार करतील असेंहि सांगितलें.

" आगामी तीस वर्षांत ७५ हैड्रोजन बॉबच्या स्फोटाचे प्रयोग झाल्यास जगांत सर्वत्र अनेक पिढ्यांपर्यंत जन्म घेणारी भावी संतति बऱ्याच संख्येनें शारीरिक व मानसिक दृष्ट्या विकृतावस्थेंततच जन्म पावेल







हें खरें आहे काय ?–प्रा. रोव्ला यांना तसें वाटतें; अमेरिकन शास्त्रज्ञांच्या मंडळानेंहि भावी काळांतील मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें असलेल्या या धोक्याविषयीं भीति व्यक्त केली आहे. तथापि अटूलांटिक महासागराच्या दोन्ही बाजूचे राज्यकर्ते मात्र, समाधान होईल व दिलासा वाटेल अशी उलट भाषा बोलत आहेत.

" या बाबतींतील सत्य बव्हंशीं वादग्रस्त आहे हें उघड आहे. तथापि तें निश्चित स्वरूपांत शोधून काढण्यासाठीं परिणामकारक उपाययोजना झाली पाहिजे, यांत तिळमात्रहि शंका नाहीं. ज्याची भीति वाटते त्या स्वरूपाचा प्रत्यक्ष धोका असल्यास रशियन जनतेच्याहि नजरेस तो आणून देणें आवश्यक आहे.

" हैड्रोजन बाँबच्या स्फोटांचे परिणाम विशेष गंभीर नाहींत असें देशांत सांगण्याचें आजचें क्रेमलिनचें धोरण आहे. परंतु सत्य प्रस्थापित झाल्यास कोणत्याहि पडद्याच्या कोठल्याहि बाजूच्या सरकारी धोरणापेक्षां तें अधिक मोठें व महत्त्वाचें ठरेल. "

## चिनी कम्युनिस्ट पुढाऱ्याची आत्महत्या

चिनी कम्युनिस्ट पुढारी काओ कँग यांच्या आत्महत्येविषयीं लिहितांना ता. ५ एप्रिलचा ' मँचेस्टर गार्डियन ' म्हणतो :

" चीनच्या कम्युनिस्ट पक्षांतील अंतर्गत कलह व अरिष्ट दर्शविणारी ही घटना आहे. काओ कँग हा एके काळीं चीनच्या कम्युनिस्ट पक्षांत चौथ्या नंबरचा सामर्थ्यवान् नेता होता. मांचुरियाचा तो स्वामी होता. मांचुरियांतील शासनयंत्रणा त्यानेंच निर्माण केली होती. तो औद्योगीकरणाचा पुरस्कर्ता होता, आणि चीनची पंचवार्षिक योजना तयार करणाऱ्या नियोजनमंडळाचें अध्यक्षपद त्याला १९५२ सालीं देण्यांत आलें होतें. त्याची सत्ता संपली आहे याची कल्पना गेल्या कांहीं दिवसांपासून आलेली होती. गेल्या सप्टेंबर महिन्यांत राज्य आणि पक्ष-संघटना यांतील निरनिराळ्या समित्यांची निवड झाली तेव्हां त्याचें नांव कोठेंहि आढळलें नाहीं. कालच्या बातमीवरून त्याच्या पदच्युतीचें कार्य पुरें होण्यास जवळ जवळ एक वर्ष लागलें असें दिसतें. ( पक्षनेत्यांना ) विरोध करण्यासाठीं पक्षांतील बराच मोठा गट त्याच्या पाठीशीं असावा असें वाटतें. त्याचप्रमाणें त्याच्या संबंधींच्या निवेदनांतील शब्दरचनेवरून लष्करांतहि त्याला पाठिंबा असावासें दिसतें.

" त्यानें गुन्हा कबूल केला नाहीं. प्रस्थापित राजवटीला असलेला आपला विरोध व्यक्त करण्यासाठीं आत्महत्या केली असें सांगण्यांत आलें आहे. त्याला फाशीं देण्यांत आलें असावें काय ? –याविषयीं तर्क केले जाणें स्वाभाविक आहे. अलिकडच्या कांहीं वर्षांत रशियाच्या मानानें आपापसांतील कितीतरी कमी रक्तपातांत नवचीनच्या नेत्यांनीं एकमेकांशीं सहकार्य केलें आहे. ही अवस्था आतां संपली असें म्हणावयाचें काय ? "

## रशियाच्या प्रचाराचें स्वरूप

ता. १७ मार्चच्या अंकांत ' मँचेस्टर गार्डियन ' लिहितो :

" आपलें भवितव्य सुरक्षित असल्याचें रशियन जनतेस सांगण्यांत येतें. उलट रशियाबाहेर अणु-युद्ध जगाचा विनाश करील असें सांगितलें जातें.

" उदाहरणार्थ, गेल्या आठवड्यांत ' प्रवदा ' लिहितो : ' साम्राज्यवादी शांतताप्रिय जनतेला अणुबाँबच्या आधारावर दमदाटी करीत आहेत; परंतु ते इतिहासक्रम बदलूं शकत नाहींत. इतिहासांतील खरी शक्ति जनताच होती आणि आहेहि. भूतकाळ तिनेंच घडविला आहे; तीच भविष्याची घडण करील, प्रगतीचें, संस्कृतीचें भवितव्य ठरवील. तिसरें महायुद्ध झाल्यास जगाचा व मानवी संस्कृतीचा विनाश संभवतो, अशा प्रकारचीं अनुमानें तात्त्विक दृष्ट्या चुकीचीं आणि राजकीय दृष्ट्या धोक्याचीं होत. जर साम्राज्यवाद्यांनीं तिसरें महायुद्ध सुरू केलें तर त्याची परिणति जगाच्या विनाशांत न होतां केवळ भांडवलशाहीच्या विनाशांतच होईल. '

" रशियाच्या संस्कृति-खात्याच्या मंत्र्यांनीं परकीय भाषेंतील कार्यक्रमांत मास्को रेडिओवरून जगांतील मातांना उद्देशून केलेल्या भाषणांतील भूमिकेहून वरील भूमिका अगदीं भिन्न आहे. त्या म्हणाल्या : ' भावी युद्धांत एकहि राष्ट्र, एकहि शहर, एकहि बेट सुरक्षित राहील असें म्हणतां येत नाहीं. युद्ध सुरू झाल्यास जगांतील प्रत्येक भागास, प्रत्येक व्यक्तीच्या जीवनास धोका आहे. ज्यांना युद्ध हवें आहे त्यांची मॉस्कोवर अणुबाँब टाकण्याची इच्छा आहे. परंतु








आमच्या देशाच्या राजधानीवर जरी पहिला बॉंब पडला तरी दुसरा वा तिसरा वा पांचवा कोठें पडेल हें कोण सांगूं शकेल ? '

"देशांतील जनतेला दिलासा मिळावा आणि परकीयांचें भीतीनें रक्त गोठावें असें या प्रचारतंत्राचें स्वरूप आहे. कोणत्याहि सरकारला देशांत भयग्रस्त वातावरण निर्माण व्हावें असें वाटत नाहीं, यामुळें हें स्वरूप समजूं शकतें. तथापि हा प्रश्न एवढ्यावरच थांबण्यासारखा नाहीं. रशियाचा प्रचार बाहेर भीति आणि कलह निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे आणि देशांत सर्वत्र पाश्चात्य राष्ट्रांना युद्ध हवें आहे अशी समजूत करून देत आहे. प्रचाराचें हें स्वरूप बेपर्वाईचें आणि घातकी आहे."

### चर्चिल यांची निवृत्ति

ता. ५ एप्रिल रोजीं ब्रिटनचे पंतप्रधान सर विन्स्टन् चर्चिल यानीं पंतप्रधानपदाचा राजीनामा दिला. या घटनेविषयीं कांहीं ब्रिटीश वृत्तपत्रीय प्रतिक्रिया पुढीलप्रमाणें होतः

' हा राजीनामा म्हणजे सर विन्स्टन यांच्या सार्वजनिक जीवनाचा शेवट नव्हे. कॉमन्स सभागृहाला पुनः त्यांचें म्हणणें ऐकावयास मिळेल, आणि आपल्यानंतर स्थानापन्न होणारांना सामर्थ्य व मार्गदर्शन देण्यास ते जवळच असतील असा विश्वास वाटतो. पक्षोपपक्षांच्या झगड्याबाहेरील वयोवृद्ध मुत्सद्द्यांचें कार्य तें करूं शकतील. मात्र पुनः त्यांच्या ठिकाणीं केव्हां नवचैतन्य दिसूं लागेल आणि त्यांच्या विलक्षण जीवनांतील नव्या प्रकरणास प्रारंभ होईल त्याचा नम नाहीं." – ' मँचेस्टर गार्डियन. '

" भूतकाळाकडे कितीहि अभिमानानें आणि वर्तमानकाळाकडे कितीहि खेदानें आम्ही पहात असलों तरी भविष्याकडील आमची दृष्टि मात्र आत्मविश्वासयुक्त व आशावादीच आहे. चर्चिलनें आमचें सामर्थ्य वाढविलें आहे; आमच्या धैर्याचें जतन केलें आहे. '

' डेली टेलिग्राफ. '

" पक्षनता म्हणून नव्हे तर एक राष्ट्रपुरुष आणि जागतिक इतिहासांतील एक महान् पुरुष या नात्यानेंच देश चर्चिलकडे कृतज्ञताबुद्धीनें पहात आहे. "

'डेली हेरल्ड.'

" अखेरीस मूल्यमापन करतांना चर्चिल यांची थोरवी त्यांनीं काय केलें या ऐवजीं ते कसे आहेत यांतच शोधावी लागेल. व्यक्ति म्हणून ते थोर आहेत. राष्ट्राचे ते एक श्रेष्ठ प्रतिनिधि आहेत. "

' यॉर्कशायर पोस्ट. '

१४-४-१९५५ — गोवर्धन पारीख

## पुस्तक-परामर्श

**महात्मा फुले आणि सत्यशोधक चळवळ**
लेखक : श्री. मा. प. मंगुडकर एम्. ए.
प्रकाशक : स. मा. गर्गे, पुणें २.

महाराष्ट्राच्या राजकीय व सामाजिक जीवनाला सत्यशोधक चळवळीमुळें कसें व किती वळण मिळालें ? या चळवळीच्या प्रणेत्यांचें कार्य आणि विभूतिमत्त्व केवढें होतें ? – महाराष्ट्राची आधुनिक घडण व भविष्य यांचें आकलन होण्याच्या दृष्टीनें या प्रश्नांचें जेवढें महत्त्व आहे त्यामानानें आजवर झालेला विचार जुजबीच आहे. या उपेक्षेचीं अनेक कारणें आहेत. त्यांत महत्त्वाचें एक कारण असें कीं आपल्या संशोधनकार्याची दिशा भारतीय राष्ट्राभिमानाच्या प्रेरणेमुळें परकीयांच्या विपर्यासांना तोंड देण्यासाठीं ठरविली गेली व या संशोधनाव्यतिरिक्त जें संशोधन झालें तें विद्यापीठांच्या चाकोरींतून झालें. केवळ महाराष्ट्रीय जीवनाचे प्रश्न, त्यांतून बहुजनसमाजाच्या सांस्कृतिक किंवा इतर जीवनाचीं अंगें हीं या संशोधनाच्या आवाक्यांतच आलीं नाहींत. राजकारणाचा नूर व आकार जसा बदलला तसाच संशोधनाचा रोखहि बदलूं लागलेला आहे हें सुचिन्हच होय. त्या दृष्टीनें, इतक्या कसोशीनें व तळमळीनें या महत्त्वाच्या विषयाचें परिशीलन करून निर्भीडपणें आपले निष्कर्ष सर्वांपुढें ठेवल्याबद्दल मी लेखकाचें अभिनंदन करतों.

इतिहास-लेखनांत केवळ वस्तुनिष्ठा अशी असूंच शकत नाहीं. कारण केवळ घडामोडींना स्वतःचा अर्थ नसून त्यांची नुसती नोंद निर्जीवच ठरते. त्या घडामोडींना गोवणारीं सूत्रें आणि त्या घडविणाऱ्या कर्त्या स्त्रीपुरुषांचीं मनें इतिहासज्ञाला गवसलीं असतील तरच तो इतिहास जिवंत होतो. चरित्रलेखनांत हाच जिवंतपणा एकाच व्यक्तीच्या रूपानें प्रत्ययास यावा







लागतो. हें कार्य अर्थात् जास्त बिकट व ग्रंथकर्त्याच्या वास्तव-ज्ञानाबरोबर त्याच्या कल्पनाशक्तीचीहि कसोटी पाहणारें असतें. अशा कसोटीला उतरणारीं किती चरित्रें आज मराठी भाषेंत आहेत ? ज्योतीबांचें असें जिवंत चरित्र लिहिलें जाण्याचा काळ पुढें केव्हांतरी येईल असें मी म्हणेन. यांतच प्रस्तुत पुस्तकाची कांहीं मर्यादा दर्शविण्याचा माझा हेतु आहे.

ही मर्यादा लेखकाच्या 'मानवतावादी' दृष्टिकोणामुळें उत्पन्न झाली आहे. सामाजिक सुधारणांची तळमळ, आध्यात्मिक व नैतिकदृष्ट्या समतेच्या तत्त्वावर अढळ श्रद्धा आणि राष्ट्राभिमान अशा तीन प्रेरणांच्या संमिश्रणानें ज्योतिबांच्या काळांतील अनेक कर्तबगार पुरुषांचीं मनें घडविलीं गेलीं होतीं. या तीन प्रेरणांचा समन्वय घालण्याची सदिच्छा सर्वांना होती, पण क्षणोक्षणीं असे प्रसंग येत होते कीं 'सामाजिक' कीं 'राजकीय', 'समता' कीं 'राष्ट्रीय ऐक्य' अशी निवड करण्याची पाळी प्रत्येकावर येत होती. कोणी कशी निवड केली, ती किती तत्त्वनिष्ठेनें व डोळसपणानें केली आणि मग स्वीकृत तत्त्वासाठीं किती प्रखर झुंज दिली हेंच आज इतिहासलेखकानें तोलावयाचें आहे. प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें या बाबतींत ज्योतीबांच्या निवडीचें बहुतांशीं समर्थन केलेलें आहे. व तें मानवतावादी' भूमिकेच्या आधारें केल आहे.

या बाबतींत प्रस्तावनेंत पान ८ वर त्यांनीं म्हटलें आहे कीं सुधारणा, समता व राष्ट्रीय चळवळीपासून दूरपणा या ज्योतीबांच्या "तीनहि भूमिकांच्या मुळाशीं त्यांचा मानवतावादी विचार प्रामुख्यानें काम करीत होता." या समर्थनामुळें ज्योतीबांच्या समकालीनांचें, त्यांच्या काळाचें व खुद्द त्यांच्या महात्मतेचें आकलन होण्यास मदत न होतां, उलट प्रत्यवायच येतो. सन १९३० नंतरच्या विशिष्ट भारतीय परिस्थितींत येथें आलेल्या साम्यवाद, मानवतावाद वगैरे कल्पनांची ('वादां'ची) छाया उलटी गतकाळांत पडलेली होती असें मानण्यामुळें ज्योतीबांच्या विचारांतील सामर्थ्य व कच्चेपणा या दोन्हींचाहि अन्वयार्थ कळेनासा होतो.

चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाला समकालीन काळाच्या कोंदणांतून काढण्याचा व त्याला एका अनाद्यंत 'वादा'च्या सूत्रांत गोंवण्याचा प्रयत्न केल्यामुळें पुस्तकाच्या चरित्र-भागांतील विवेचन मला सदोष वाटतें पण सत्यशोधक चळवळीवरील विवेचनामुळें ही उणीव सव्याज भरून आली आहे. त्या विवेचनांत एकांगीपणाचा दोष नाहीं. त्या चळवळींतील प्रारंभिक ओजाचा गौरव लेखकानें केला आहे, आणि नंतरच्या 'सत्ताशोधक' काळांतील भ्रष्टतेची निर्भत्सनाहि त्यानें निःस्पृहपणें केली आहे. प्रारंभींचें ओज व नंतरची भ्रष्टता यांची मीमांसा करतांना ज्योतीबांच्या 'मानवतावादी' प्रेरणेचा आधार घेऊन त्यांनीं जी चर्चा केली आहे ती वगळल्यास बाकीचें विवेचन अभ्यासपूर्ण व तपशीलवार झालें आहे.

या एकंदर प्रश्नाच्या भोंवतीं माजलेलें दुराग्रहांचें रान मोकळें व्हावें व या बाबतींत सर्वांना डोळस अनाग्रहीपणा येऊन महाराष्ट्रांतील जातीय प्रश्न सलोख्यानें व समंजसपणानें सुटावा, हा उद्देश ग्रंथकारानें एकसारखा नजरेसमोर ठेवलेला आहे व त्यामुळें जातीय प्रश्न सुटण्याच्या बाबतींत ग्रंथांत सुचविलेली उपाययोजना विचारार्ह झाली आहे. प्रस्तावनेंतच त्यांनीं म्हटल्याप्रमाणें हा प्रश्न खरा सुटावयाचा तर त्यासाठीं व्यक्तिस्वातंत्र्य, समता व लोकशाही या तत्त्वांची खरीखुरी ओळख आपल्या ग्रामीण समाजाला झाली पाहिजे; त्या समाजाच्या नित्याच्या जीवनांत हीं तत्त्वें आचरलीं जातील असे प्रयत्न आजच्या समाजसेवकांनीं केले पाहिजेत. पण हीं उदात्त तत्त्वें लोकमनांत रुजावीं कशीं ? तेथें जर परंपरागत कल्पना ठाण मांडून बसल्या आहेत तर नव्या कल्पनेचा प्रवेश होणार कसा ? हे प्रश्न बिकट आहेत व यांची केवळ आर्थिक किंवा राजकीय तोडग्यांनीं झटपट सोडवणूक शक्य नाहीं. चारदोन सहभोजनांनीं व प्रतिलोम-विवाहांनींहि हे प्रश्न सुटणारे नाहींत. त्यासाठीं जातिसंस्थेचें प्राचीन व आजचें स्वरूप, वेगवेगळया जातींनीं केलेल्या भल्या व बुऱ्या कार्याचें समतोल मोजमाप व आज जातिहीन समतावादी समाजव्यवस्थेच्या आदर्शाकडे धीमेपणानें जाण्याची गरज यांचें ज्ञान सर्व समाजांत पसरवीत राहिलें पाहिजे. तेंच कार्य प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें लेखकानें केलें आहे म्हणून पुन्हा एकदां त्यांचें अभिनंदन करतों

—दि. के. बेडेकर